


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुरस्कृत
व प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक



# नवभारत

वर्ष ३६ । अंक ९ । जून १९८३
किंमत ४ रुपये । वार्षिक वर्गणी ३० रुपये



अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

संपादक
मे. पुं. रेगे

कीय पत्रव्यवहार :
पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
( जि. सातारा )

अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

जून १९८३

अ नु क्र म



## लेखक-परिचय

■ **अनिरुद्ध कुलकर्णी :** कवी, चिकित्सक लेखक व कॉन्टिनेन्टल प्रकाशनचे मालक, विजयानगर कॉलनी, पुणे-४११ ०३०. ■ **संजय पळशीकर :** संशोधन सहायक, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ एज्यूकेशन, १२८/२ कर्वे रोड, कोथरूड, पुणे-४११ ०२९. ■ **सी. पं. खेर :** अर्थशास्त्राचे अभ्यासक, गांधी चौक, धारवाड-५८० ००१ (कर्नाटक राज्य) ■ **ना. बा. मराठे :** संपादक, इंडियन नॅशनल बिब्लिऑग्राफी, सेंट्रल रेफरन्स लायब्ररी, बेल्व्हेदेर, कलकत्ता-७०० ०२७. ■ **टी. आर. भोसले :** मराठीचे प्राध्यापक, लालबहादूर शास्त्री कॉलेज, सातारा.


अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## संपादकीय

### मार्क्सवाद आणि वासाहतिक समाज

आशियामध्ये जन्माला आलेला ख्रिस्ती धर्म मुख्यतः युरोपमध्ये पसरला आणि युरोपीय विस्ताराच्या मार्गाने परत आशियामध्ये आला. युरोपमध्ये जन्माला आलेला मार्क्सवाद कदाचित आशिया–आफ्रिकेमध्ये पसरेल आणि ह्या मार्गाने युरोप–अमेरिकेत जाईल.

मार्क्सने भारतामधील ब्रिटिश राजवटीचे अतिशय मार्मिक विश्लेषण केले आहे. भारतीय जनतेविषयी मार्क्सने ज्या आपुलकीने आणि आदराने लिहिले आहे त्याला युरोपेतर जगाविषयी एकोणिसाव्या शतकात झालेल्या पाश्चात्त्य लिखाणात तोड नाही. तो काळच युरोपीय सत्तामदाचा, सांस्कृतिक दर्पाचा काळ होता. पण मार्क्स नेहमीच नाडलेल्यांच्या बाजूचा होता. खऱ्या संस्कृतीचा जगभर प्रसार करण्याचे ईश्वरदत्त कार्य युरोपने हाती घेतले होते त्याच्यातील स्वार्थ, सत्तालालसा, पाशवी निष्ठूरपणा मार्क्सला स्पष्टपणे दिसत होता. मार्क्सच्या चित्ताची सारी कोवळीक आणि त्याचा तर्ककर्कश वास्तववाद ह्यांचा मार्क्सच्या ह्या लिखाणात प्रकर्षाने आविष्कार झाला आहे.

आणि तरीही मार्क्स युरोपीय होता. मानवी इतिहासाची वाटचाल ख्रिस्ती–जर्मन समाजात, सनदशीर राजसत्ताकात ( मॉनर्की ) फलद्रूप होते, चिनी, भारतीय यांसारखे इतर वंश किंवा मानव-समाज इतिहासाच्या उत्क्रांतीच्या विशिष्ट पर्वाला साजेशी सांस्कृतिक कामगिरी बजावून ह्या उत्क्रांती-तून निवृत्त होतात असे मांडणाऱ्या हेगेलच्या इतिहास–तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमी त्याच्या विचारांना होती. ( इतिहासाच्या वैश्विक नाट्यप्रयोगातील आपल्या वाट्याला आलेली भूमिका वठविल्यानंतर उरलेल्या अनंत काळात, उदा. भारतीय समाजाने काय करायचे हा प्रश्न, हेगेलचे इतिहास–तत्त्वज्ञान समजून घेतलेल्या भारतीयांना पडतो. ह्या प्रश्नाचा जाच हेगेलला होण्याचे कारण नव्हते. मार्क्स कोणत्याही मानवी समाजाला इतिहासातून निवृत्त करीत नाही. कारण मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे मानवी इतिहासात ज्याचा आविष्कार होतो ते तत्त्व म्हणजे एक प्राणिजाती म्हणून माणसाचे जे स्वरूप, स्वत्व ( स्पीशीज–एसेन्स ) असते ते होय; हेगेल मानतो त्याप्रमाणे दृश्य विश्वापासून भिन्न असलेले शुद्ध चैतन्य नव्हे. हे जाति–स्वत्व प्रत्येक मानवी व्यक्तीमध्ये असते व म्हणून मानवी व्यक्तींच्या बनलेल्या कोणत्याही विशिष्ट समाजाला मानवी इतिहासात कायमचे स्थान असते. ) तरीही मार्क्सने युरोपेतर जगाचा इतिहास आदिम साम्यवाद आणि आशियाई उत्पादनप्रकार या अवस्थांत गुंडाळून घेतला. यानंतरचा इतिहास युरोपीय समाजात घडतो. भांडवलशाहीची विकसित अवस्था असलेल्या साम्राज्यशाहीच्या पर्वात युरोपेतर समाज परत इतिहासाच्या रिंगणात खेचले जातात. भांडवलशाहीचे केंद्र असलेल्या युरोपमधील देशांतील कामगारवर्ग जेव्हा स्वतःचे विमोचन घडवून आणील तेव्हा युरोपेतर समाजांचीसुद्धा साम्राज्यशाहीच्या विळख्यातून सुटका होईल असे मार्क्सचे भाकीत होते.

पण युरोपीय कामगारवर्गाने आपले विमोचन साधले नाही. आपले इतिहासदत्त कार्य विसरून, ट्रेड युनियन्सच्या साहाय्याने आपली मजुरी वाढवून घेण्यात, कामाचे तास कमी करून घेण्यात, आणि सुखासीनतेने जगण्यात तो अधिकाधिक गुंतत गेला. ह्या वाढत्या मजुरीत वासाहतिक समाजांची–विशेषतः त्यांतील शेतकरी, शेतमजूर, कामगार यांची पिळणूक करून मिळालेल्या संपत्तीचा वाटा अर्थात होताच. मार्क्समधील क्रांतीचे मार्क्सनंतर जे नेतृत्व केले ते लेनिनने केले आणि लेनिन साम्राज्य-

अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शाहीच्या युगात–साम्राज्यशाही बहराला आलेल्या युगात–जगत होता. प्रगत भांडवलशाही समाजातील कामगारवर्गाच्या स्थितीतले हे अंतर्द्वंद्व–स्वत:च्या समाजातील शोषित आणि वसाहतीतील श्रमजीवी वर्गाचे शोषक, म्हणजे स्वतःच्या शोषकांचे साथीदार–त्याला दिसत होते. अंतिम क्रांती करणारा वर्ग हा प्रचलित समाजव्यवस्थेत ज्याने सर्वस्व गमावलेले असते असा वर्ग असतो हे क्रांतीच्या तत्त्वज्ञानातील पहिले तत्त्व आहे. असा वर्ग प्रगत भांडवलशाही समाजात आढळणार नाही, कारण हे समाज साम्राज्यशाही समाज असतात, तो वासाहतिक समाजात आढळेल ही लेनिनची मर्मदृष्टी होय. क्रांतीचे लोण लंडन–पॅरिसहून पेकिंग–कलकत्ता येथे पोचणार नाही, क्रांतीचा ओघ उलटया दिशेने वाहात येईल ही अटकळ त्याने बांधली.

लेनिनची आणखी एक मर्मदृष्टी होती. सर्वहारा वर्गच अंतिम क्रांती करायला उद्युक्त होतो हे जसे खरे आहे, त्याप्रमाणे तो एकटाच ही क्रांती करू शकत नाही हेही खरे आहे. कारण त्याचा असंतोष खदखदायला लागला की भांडवलदारवर्ग आणि इतर धनिक त्याच्या तोंडावर काही तुकडे फेकून त्याला तात्पुरते शांत करण्याचा प्रयत्न करीत राहतील आणि त्यात त्यांना यशही येईल. ह्या थंड शितोड्यांनी क्रांतिकारक प्रेरणेची धग कमी होईल. कामगार अखेरीस संसारी माणसे असतात, त्यांना बायकापोरे असतात, पोरांचे पुढे कसे होणार ही काळजी असते. ते काही नेहमी डोक्याला कफन बांधून, आहे त्याची पुरती मोडतोड करून त्याच्या जागी नवीन व्यवस्था उभारायला बाहेर पडलेले नसतात. त्यांना स्वत:चे जीवन असते, हिशोब असतो. इतिहासाचे नियम ज्यांना अवगत असतात, त्याच्या अपरिहार्य भवितव्याचे ज्ञान ज्यांना असते, श्रमिक वर्ग हा ह्या इतिहासाच्या प्रवाहाचा वाहक आहे हे आकलन ज्यांना झालेले असते अशी जाणती माणसेच श्रमजीवी वर्गाकडून क्रांती घडवून आणू शकतात. ह्यासाठी श्रमजीवी वर्गाला संघटित करावे लागते, क्रांतीच्या अपरिहार्यतेची त्यांना सतत शिकवण द्यावी लागते, त्यांच्यांत स्वाभाविकपणे धुमसत असलेल्या असंतोषाला क्रांतीच्या प्रेरणेचे स्वरूप द्यावे लागते, तात्कालिक स्वार्थ, दमछाक यांनी ही प्रेरणा क्षीण होणार नाही, ती सतत प्रखर राहील अशी काळजी घ्यावी लागते आणि मोक्याच्या क्षणी त्यांचा उठाव घडवून आणून किंवा उत्स्फूर्तपणे त्यांच्या झालेल्या उठावाचे नेतृत्व करून त्यांच्या वतीने सत्ता काबीज करावी लागते. आणि नंतर ह्या सत्तेचा वापर समाजवादी व्यवस्थेच्या निर्मितीसाठी करायचा असतो. मूठभर शहाणी, सत्प्रवृत्त, ध्येयवादी माणसे सामाजिक क्रांती घडवून आणू शकत नाहीत. त्यासाठी समाजातील मोठ्या वर्गाचे चलनवलन आवश्यक असते. पण क्रांती घडवून आणण्यासाठी ह्या चलनवलनाला दिशा आणि दृष्टी द्यावी लागते. हे काम जाणती माणसेच करू शकतात.

ही जाणती माणसे अर्थात शिक्षित असावी लागतात. म्हणजे ती प्रामुख्याने कामगारवर्गातून येणार नाहीत, ती इतर वर्गांतून येतील. परंतु ती स्वतःच्या वर्गीय हिताच्या बाहेर आलेली असतील, कामगारवर्गाच्या हिताशी, किंवा वेगळ्या शब्दांत समाजाच्या इतिहासाने निर्धारित केलेल्या भवितव्याशी त्यांनी स्वत:ला बांधून घेतलेले असेल. म्हणजे ती 'निर्वर्ग' (डीक्लास्ड) झालेली असतील. हेगेलसुद्धा राज्याचा प्रत्येक घटक (इस्टेट)– पारंपरिक जमीनदारवर्ग, कारखानदार–व्यापारी वर्ग, इ.– स्वत:चे हित सांभाळण्यात मग्न असतो असे मानतो. पण हेगेलला ह्या विशिष्ट वर्गांपलीकडे एका 'सार्विक' (युनिव्हर्सल) वर्गाचीही जरुरी भासते. ह्या वर्गाला स्वत:चे विशिष्ट वर्गीय हित नसते, तो सार्वजनिक हित, न्याय ह्या तत्त्वांना अनुसरून, विशिष्ट वर्गीय हितसंबंधांच्या विरोधांतून उद्‌भवणाऱ्या संघर्षांचे निरसन करतो आणि कायदा व सुव्यवस्था यांची चौकट तोलून धरतो. हा सार्विक वर्ग म्हणजे आधुनिक नोकरशाही. (हेगेलच्या मताप्रमाणे बाह्य जगातील इतिहासाचा विकास स्वतंत्र आणि समान अशा नागरिकांच्या बनलेल्या आधुनिक राज्याच्या उद्‌भवानंतर संपुष्टात आलेला असतो. ह्यानंतरची डायलेक्टिकची प्रगती मनात जाणिवेच्या रूपांच्या विकासातून होत असते.) पण मार्क्सच्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मताने इतिहासाला आणखी एक टप्पा गाठायचा असतो. तो म्हणजे निर्वर्ग असा समाज. कामगार-वर्गाकडून होणाऱ्या क्रांतिद्वारा हा टप्पा गाठला जाणार असतो. ह्यात लेनिनने घातलेली महत्त्वाची भर अशी की क्रांती घडवून आणण्यासाठी कामगारवर्गाचे नेतृत्व निर्वर्ग झालेल्या मध्यमवर्गीय साम्य-वादी गटाला– कम्युनिस्ट पक्षाला– करावे लागते.

कम्युनिस्ट पक्ष ही मानवी इतिहासातील अभूतपूर्व अशी घटना आहे. मोक्षाच्या साधनेसाठी संघटित होणारे आणि आणि अत्यंत कठोर अशा सामूहिक शिस्तीला स्वतःला स्वेच्छेने बांधून घेणारे भिक्षुश्रमणांचे संघ इतिहासाला भारतामध्ये व अन्यत्र परिचित होते. उदा., पायथॅगोरसच्या अनुयायांचे संघ किंवा ख्रिस्ती भिक्षूंचे संघ. निवडणुकांचे राजकारण ज्या देशांत रूढ असते तेथे साधारणपणे विशिष्ट वर्गांच्या व गटांच्या हितसंबंधांवर आधारलेल्या कार्यक्रमाचा पाठपुरावा करण्यासाठी संघटित होणारे राजकीय पक्षही आपल्या परिचयाचे आहेत. पण एका विशिष्ट सामाजिक तत्त्वज्ञानाला अनु-सरून समग्र समाजाचे मूलगामी परिवर्तन करण्याच्या ध्येयाला वाहून घेतलेला, ह्या ध्येयसिद्धीसाठी संघटित होणारा, अतिशय कडक अशा शिस्तीचे, साधकाच्या सत्त्वाची सतत परीक्षा घेणाऱ्या शिस्तीचे स्वेच्छेने पालन करणारा कम्युनिस्ट पक्ष ही आधुनिक संस्कृतीतील वैशिष्टयपूर्ण घटना आहे. कम्युनिस्ट पक्षात प्रवेश घेणारी माणसे कोणकोणत्या प्रेरणांमुळे ह्या खडतर तपस्येला वाहून घेतात हा समाज-शास्त्रीय व मानसशास्त्रीय संशोधनाचा विषय आहे. मार्क्सवादाप्रमाणे पाहता कम्युनिस्ट पक्षाच्या उदयात आणि विस्तारात अद्‌भूत, गूढ असे काहीही नसणार. ज्याची स्पष्ट अशी शास्त्रीय उपपत्ती देता येते अशी ही एक सामाजिक घटना असणार. भविष्यपुराणात सर्व भावी घटनांचे प्राक्कथन केलेले असते आणि म्हणून भविष्यपुराण कोणत्या छापखान्यात छापले जाणार आहे ह्याचेही कथन त्याच्यात करावे लागते. तसाच काहीसा हा प्रकार आहे. पण क्रांतिपूर्व रशियात, चीनमध्ये, नात्सी जर्मनीत, आणि जेथे जेथे निरंकुश, निर्घृण राजवटी होत्या आणि आहेत तेथे तेथे कम्युनिस्ट ज्या निग्रहाने, जिद्दीने, निर्भयतेने आणि एकाग्रतेने क्रांतीची साधना करीत होते आणि आहेत त्याला ऐहिक जीव-नाच्या क्षेत्रात कुठे तोड आढळणार नाही. ह्या गुणांच्या आविष्काराची समान उदाहरणे शोधण्यासाठी आध्यात्मिक साधनेकडेच वळावे लागेल. एक गोष्ट अर्थात उघड आहे. कम्युनिस्टांच्या साधनेला आद्य प्रेषित, त्यांनी प्रसविलेले धर्मग्रंथ, त्यांचे अधिकृत भाष्यकार, श्रेष्ठ साधकांची, सत्यासाठी हौतात्म्य पतकरलेल्या साधकांची अद्‌भुतरम्य जीवने ह्या सर्व धार्मिक अवडंबराचे साहाय्य झालेले आहे. ह्याबरो-बरच ज्यांची कम्युनिस्ट तत्त्वज्ञानावरील श्रद्धा संशयातीत आहे पण जगाच्या व्यवहारात जे मुरलेले आहेत, शक्य काय आहे, व्यवहार्य काय आहे ह्याचा जे उत्तम प्रकारे विवेक करू शकतात आणि अटळ असलेल्या प्रासंगिक डावपेचांना अंतिम तत्त्वांपासून निष्पन्न होणारी सत्ये हे रूप देण्यात प्रवीण असतात अशा व्यवहारधुरंधर नेत्यांचे नेतृत्वही कम्युनिस्ट पक्षाच्या (किंवा पक्षांच्या) आजच्या यशाला कार-णीभूत ठरले आहे. ह्या दृष्टीने कम्युनिस्ट नेतृत्वाची व रोमन कॅथलिक चर्चच्या नेतृत्वाची तुलना करणे उपयुक्त ठरेल.

कम्युनिस्ट तत्त्वज्ञान सिद्ध झाल्यानंतर आणि कम्युनिस्ट पक्षाचे मॉडेल तयार झाल्यानंतर मागासलेल्या, वासाहतिक देशांत, जेथे साठसत्तर टक्के लोक (तांत्रिक) दारिद्र्यरेषेखाली राहतात आणि नव्वद टक्के लोक गरीब असतात तेथे कम्युनिस्ट पक्ष उदयाला येऊन प्रभावी होणे जवळजवळ अटळ आहे. कारण असे समाज दुहेरी अर्थाने इतिहासाचे बळी असतात. सबंध समाजाला वसाहतीचा दर्जा मिळालेला असतो. तो प्रगत भांडवलशाही राष्ट्राच्या अंकित असतो, राजकीय, आर्थिक, सांस्कृ-तिक पारतंत्र्यात असतो, त्याची थोर प्राचीन संस्कृती अप्रस्तुत म्हणून बाजूला सारण्यात आलेली असते. त्याचा राष्ट्रीय स्वाभिमान खोलवर दुखावलेला असतो. पण ह्याबरोबरच आपला स्वामी झालेल्या समाजाची संस्कृती, विद्या व कौशल्ये आत्मसात करूनच आपल्याला समर्थ बनता येईल हेही


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समाजाच्या धुरिणांना दिसत असते. मार्क्सवाद ह्या कोंडीतून त्याची सुटका करतो, त्याच्या वांशिक न्यूनगंडाचे निरसन करून त्याच्या स्वाभिमानाची पुनःस्थापना करतो. मानवी इतिहासातील अपरिहार्य प्रगतीचे तात्कालिक बळी आपण असलो तरी स्वतःच्या आणि मानवजातीच्या अंतिम विमोचनासाठी चाललेल्या युद्धातील आघाडीचे सैनिक आपण आहोत ह्या आत्मदर्शनावर हा स्वाभिमान आधारलेला असतो. पण एवढेच नाही. मार्क्सवाद मागासलेल्या देशांना साथीदार मिळवून देतो. हा एकाकीपणे लढण्याचा लढा नाही. सर्वच मागासलेले समाज ह्या लढ्यात सहभागी आहेत, हा जगड्व्याळ लढा आहे, प्रगत देशांतील कामगारही आपले साथीदार आहेत, इतकेच काय हे युगानुयुगे चाललेले युद्ध आहे, पहिल्या गुलामांनी पहिल्यांदा केलेल्या उठावापासून हे युद्ध सुरू झाले आहे आणि समग्र मानव-जातीच्या संपूर्ण विमोचनापर्यंत ते चालणार आहे, ह्या युद्धातील आपण सैनिक आहोत हे मानवी समाजाचे मार्क्सवाद घडवून देत असलेले दर्शन लढणाऱ्यांचे धैर्य, कितीही आपत्ती आल्या आणि पिछेहाट झाली तरी, खचू देत नाही.

शिवाय मागासलेल्या समाजातील बहुसंख्य समाज गरीब असतो. जोपर्यंत ही जगाच्या सुरु-वातीपासून चालत आलेली परिस्थिती आहे, तिच्यात बदल होणे शक्य नाही, आपले नशीब चांगले असले तर आपण तिच्यातून सुटू शकू, पण ह्यावर भरवसा ठेवता येणार नाही, आपण ही परिस्थिती सहन करायला शिकले पाहिजे अशी गरिबांची वृत्ती असेल तोपर्यंत असा विषम समाज स्थिर राहू शकतो. पण हे माणसांनी आपल्यावर लादलेले दारिद्र्य आहे, त्याच्यावर इलाज आहे, ही परिस्थिती बदलता येते, आपली गरिबी चालू राहण्यात ज्यांचे स्वार्थी हित असते तेच ह्या बदलाच्या आड येतात, पण सत्ता त्यांच्या हाती आहे आणि ती हिसकावून घेतल्याशिवाय आपली परिस्थिती सुधारणार नाही हे दर्शन गरिबांना झाले की ते क्रांतीला तयार होतील. मार्क्सवाद हे दर्शन त्यांना घडवितो.

म्हणजे मार्क्सवादापासून वासाहतिक समाजातील शिक्षित नेत्या वर्गाला राष्ट्रीय पुनरुत्थानाची प्रेरणा मिळते, ह्या पुनरुत्थानाचा मार्ग त्यांना मार्क्सवाद दाखवून देतो. आणि गरीब वर्गाला स्वतःच्या विमोचनाची प्रेरणा आणि मार्ग मार्क्सवादापासून मिळतो. राष्ट्रीय पुनरुत्थान आणि अंतर्गत सामाजिक क्रांती ह्या दोन प्रेरणांचे एक स्फोटक रसायन अशा समाजात तयार होते. जर वासाहतिक समाजातील नेत्या वर्गाने आपल्या समाजातील दारिद्र्याचे व विषमतेचे प्रश्न तातडीने सोडविले नाहीत तर, मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या उदयानंतर आणि कम्युनिस्ट पक्षाचे मॉडेल स्थिर झाल्यानंतर, त्या समाजात मार्क्सवादी क्रांतीचा स्फोट होणे अटळ आहे.

उपाशी माणसाला ईश्वराने दर्शन दिले तर तो ते भाकरीच्या स्वरूपात देईल असे गांधीजींचे एक वचन आहे. मार्क्सवाद उपाशी गुलामांपुढे भाकरी आणि स्वाभिमान दोन्ही उभे करतो.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# ‘ दस्तएवस्कीचे तत्त्वमंथन ’

अनिरुद्ध कुलकर्णी

‘तत्त्वज्ञान’ हा शब्द चांगला आहे. दस्तएवस्कीचे असे काही तत्त्वज्ञान आहे. ‘तत्त्वचिंतन’ हा शब्द तत्त्वज्ञानाकडे घेऊन जाणारी मानसिक क्रिया-प्रक्रिया सूचित करतो. असे ‘चिंतन’ही थोडेफार दस्तएवस्कीत आहेच. पण या दोन्ही शब्दांपेक्षा ‘तत्त्वमंथन’ हा शब्द त्याच्या बाबतीत जास्त योग्य. मंथन म्हणजे घुसळणे, जोरदार चलनवलन. या घुसळण्यातून ‘तत्त्व’ हाती लागते. लागेलच याची खात्री नाही पण शक्यता असते. दस्तएवस्कीत अशी घुसळण आहे. वाद, प्रतिवाद, खंडन-मंडन, अगदी खडाजंगी चर्चा दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांत वारंवार घडतात. मनमोकळ्या प्रांजळ गप्पाही होतात आणि यातून तत्त्वज्ञानाकडे वाटचाल होते· ही वाटचाल वादळी आणि नाट्यपूर्ण ठरते. दस्तएवस्कीच्या कादंबऱ्या आपल्याला नुसत्या अंतर्मुख करीत नाहीत किंवा अस्वस्थ करून सोडीत नाहीत. त्या सुन्न करतात आणि ढवळून काढतात. वादळी सागरावरून जहाज कसेबसे किनाऱ्यावर लागावे तसे आपण शेवटापर्यंत येऊन ठेपतो.

दस्तएवस्कीकडे आज अस्तित्ववादाचा एक पूर्वसूरी म्हणून पाहिले जाते. ईश्वराशिवाय ख्रिश्चॅनिटी ज्यांना हवी आहे असे ख्रिश्चन विचारवंतही त्याच्याकडे मोठ्या विश्वासाने बघतात हे ठीकच आहे; परंतु दस्तएवस्कीचे मूळ उद्दिष्ट काही तत्त्वज्ञान मांडणे हेच नव्हते. तो अतिशय श्रेष्ठ प्रतिभेचा अस्सल कादंबरीकार, कथाकार होता. त्याचे उद्दिष्ट ‘कादंबऱ्या’ लिहिणे हे होते. त्याच्या साहित्य-साधनेची सुरुवात ‘पूअर फोक’ या छोटेखानी कादंबरीने झाली आणि शेवटही महाकाव्याच्या दर्जाच्या कादंबरीनेच झाला. या कादंबऱ्या तत्त्वज्ञानात्मक होत्या. तत्त्वचिंतन, विचारमंथन हा दस्तएवस्कीच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि जीवनाचा अविभाज्य भाग होता. त्याने अनेक निबंधही लिहिलेले आहेत. हे



सारे वैचारिक निबंध ‘ दि डायरी ऑफ ए रायटर ’ या नावाने आज ज्ञात आहेत. तत्त्वचिंतनाचे हे अंग दस्तएवस्कीने कादंबरीलेखनात दूर ठेवले नाही. कादंबरी ही विचार मांडण्याची जागा नव्हे असे त्याने कधीच मानले नाही. त्याचे तत्त्वचिंतन अगदी सहजपणे त्याच्या कादंबऱ्यांचा भाग बनून गेले. इतके, की त्याच्या कादंबऱ्या तत्त्वचिंतनात्मक कादंबऱ्या म्हणूनच ओळखल्या जातात. समर्थ आणि वेगवान कथानके, जिवंत, अविस्मरणीय व्यक्तिरेखा, नाट्यपूर्ण प्रसंग, स्वतःचे असे प्रभावी वातावरण या साऱ्या घटकांची उपस्थिती त्याच्या प्रत्येक कादंबरीत असतेच. पण या उपस्थितीतदेखील तत्त्वज्ञानाचे अंग अगदी ठसठशीतपणे आपल्या समोर येते हा याचा अर्थ. कादंबऱ्यांच्या एकंदर जडणघडणीतच तत्त्वचिंतन महत्त्वाचा भाग घेते हाही याचा अर्थ होय.

दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांत तत्त्वचिंतन, तत्त्वमंथन कसे येते ? तर ते अनेक प्रकारे येते. संवाद, वादविवाद, विलक्षण उद्‌गार, स्वगतपर चिंतने, उपदेशात्मक भाषणे या रूपाने ते येते आणि कादंबऱ्यांतील कथानकांची सूत्रे, व्यक्तिरेखांच्या निर्मिती-मागची तत्त्वे, किंवा खुद्द विलक्षण घटना, किंवा कृत्ये म्हणून देखील येते. म्हणजे अंतर्बाह्य आणि सर्वांगांनी तत्त्वचिंतन हे साहित्यकृतीला वेढून टाकणारे ठरते. आणि उजळून टाकणारे देखील ठरते. अनेक प्रसंगी त्याचा धगधगीतपणा डोळे दिपवून टाकणारा ठरतो.

द इन्सल्टेड अँण्ड ह्यूमिलिएटेडचा ‘लेखक’ आणि प्रिन्स वालकोवस्की यांचा संवाद; पॉर्फिरी झाम्यातोफ, राझुमिहिन आणि रास्कोलनिकोफ यांचा वाद-विवाद, किंवा रास्कोलनिकोफ पोलीस-चौकीतून बाहेर पडत असताना एक गुन्हेगार त्याच्या कमरेला विळखा घालतो तेव्हाचा तो विलक्षण संवाद

अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि त्याशेवटी येणारा रास्कोलनिकोफचा 'ईश्वर तुला क्षमा करील' हा उत्स्फूर्त उद्‌गार; 'ए रॉ यूथ'मधील आर्कादीची स्वगतपर चिंतने किंवा रास्कोलनिकोफची चिंतने, मिखाईल किंवा माकारची, किंवा फादर झोसिमाची उपदेशात्मक भाषणे किंवा वेर्सिलोफने त्याच्या मुलाशी–अर्कादीशी–केलेले हृदयंगम हितगूज ही कोण विसरू शकेल ? इपोलितचे लेखवाचन– त्याच्या मृत्युपत्राचे वाचन–कोणाला आठवणार नाही ? तत्त्वचिंतन किती प्रकारांनी आणि किती सहजतेने येते याची ही उदाहरणे होत. 'क्राईम अॅण्ड पनिशमेन्ट'चे तत्त्वज्ञानात्मक सूत्र तर नावापासूनच स्पष्टपणे येते. तोच प्रकार कारामाझोफमधील ब्रदरहूडचा, बंधुत्वाचा. पण क्राईम अॅण्ड पनिशमेंटमध्ये 'खुनाच्या हक्काची' theme– सूत्र –किती सहजपणे आलेली आणि चर्चिली गेलेली आहे ते पाहण्यासारखे आहे. 'इडियट' मधील 'परंपरेचा वारसा' हे सूत्र असेच एक उदाहरण होय. तर व्यक्तिरेखांची निर्मितीच कशी तत्त्वज्ञानात्मक पद्धतीने दस्तएवस्की करतो हे पाहायचे असेल तर किरिलोफ–शातोफ ही जोडी किंवा मादाम स्तावरोजिन–स्तेपान वेरहोवेन्स्की ही मित्रमैत्रिणींची जोडी अभ्यासावी. मादाम स्तावरोजिन ही रशियातील कालबाह्य होऊ पाहाणारी महाजनसत्ता आणि स्तेपान हा अयशस्वी ठरलेला दुबळा रोमँटिक उदारमतवाद यांचीच मैत्री ठरतात असे दिसून येते. काही वेळा विलक्षण कृती हीच 'तत्त्वज्ञान' होते. उदाहरणार्थ, येशू ख्रिस्ताने घेतलेले ग्रँड इनक्विझिटरचे चुंबन किंवा रोगोझिन आणि मिश्किन यांनी केलेली गळचातील क्रॉसची अदलाबदल, किंवा पीटर वेरहोवेन्स्कीचे चालत्या रेल्वे डब्यात चढणे. या कृतींभोवती असलेली प्रतीकात्म अर्थांची वलये पाहिली, की आपण नक्कीच स्तिमित होऊन जातो.

दस्तएवस्कीचे 'तत्त्वज्ञान' हे फार गुंतागुंतीचे किंवा अवघड नाही. ते तसे वाटते कारण दस्तएवस्कीचे 'मानसशास्त्र' गुंतागुंतीचे, अवघड आहे. विविध व्यक्तिरेखांच्या मनोव्यापारांचे इतके सूक्ष्म आणि चित्रविचित्र चित्रण तो करीत राहतो की, मूळ विचार दुस्तर आणि नाट्यपूर्ण होऊनच आपल्यासमोर येतात. एकेका साध्या विधानांना अर्थांच्या झालरी चिकटतात. ही मनोविश्लेषणात्मक गुंतागुंत बाजूला सारून दस्तएवस्कीच्या तत्त्वज्ञानाचे आशयसार थोडक्यात मांडता येते का ते पाहू –

"एका माणसाने दुसऱ्या माणसाला ठार मारणे हा कायदेशीर गुन्हा आहे. त्याहीपेक्षा म्हणजे हे 'पाप' आहे. पाप अशासाठी की, हत्येमध्ये कुठलाही एक मानवप्राणी दुसऱ्या माणसाचे 'भावंड' असते हे मूलभूत नैतिक नाते पायदळी तुडविले जाते. खुनी माणसाला शिक्षा होते तुरुंगवासाची, सक्त मजुरीच्या कारावासाची. ती त्याने सोसली पाहिजे. खुनी माणसाला फाशी देणे हा दुसरा गुन्हा खूनच होय. यात संपूर्ण समाज सहभागी ठरतो. खुनी माणसाने शिक्षा सोसणे हा शारीरिक दंड आहे. त्याने मनोयातना (सफरिंग, अँग्विश) देखील सोसल्या पाहिजेत. त्याला पश्चात्ताप झाला पाहिजे. कारण अशा पश्चात्तापापासूनच तो खऱ्या अर्थाने पापमुक्त होऊ शकतो.

खऱ्या अर्थाने पापमुक्त होण्यासाठी हृदयपालट व्हावा लागतो. अंतःकरणातच क्रांती व्हावी लागते. गुन्हेगाराच्या अंतःकरणात 'बंधुभाव', सर्व माणसांविषयी बंधुभाव निर्माण होतो तेव्हाच ही क्रांती घडून येते. हा बंधुभाव 'साक्षात्कारा'तून निर्माण होतो. 'बंधुभावनेचा साक्षात्कार', यासाठी दैवी व्यक्तिमत्त्वाची प्रभावी व्यक्ती गुन्हेगाराच्या संपर्कात आल्यास उपयोगी ठरते. ख्रिस्ताच्या जीवनसंदेशातही हे सामर्थ्य आहे.

गुन्हेगार गुन्हा करतो. त्याला आपण सामान्य माणसे अडवू शकत नाही. म्हणजे अप्रत्यक्ष रीत्या आपणही त्याच्या गुन्ह्यात सहभागी आहोत. या परिस्थितीत बदल घडवून आणण्यासाठी आपणच बंधुभावावर अधिष्ठीत असा समाज निर्माण केला पाहिजे. नवा माणूस तयार केला पाहिजे. खरी क्रांती ती ही आहे. सुखी व चैनी समाजाची निर्मिती ही नव्हे."

या विधानाचा नुसता प्राथमिक विचार जरी केला, तरी ते माणसाच्या आस्तित्वाविषयीच काही सांगते आहे हे लक्षात येईल. अर्थात 'माणसाचे' आणि 'नैतिक' आस्तित्व. माणसामाणसांतील मूलभूत संबंधावरच ते प्रकाशझोत टाकते आहे. अन्न, वस्त्र, निवारा आणि पुनरुत्पादन या मूलभूत गरजा

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भागविण्यासाठी माणसे जे साधे जीवशास्त्रीय संबंधांचे जाळे विणतात ते येथे अभिप्रेत नाही. माणसाचा माणसाशी जो माणूस म्हणून संबंध असतो तो येथे अभिप्रेत आहे.

या विधानातील प्रत्येक वाक्यावर उलटसुलट मते मांडता येतील आणि त्यांचा खल, शहानिशा करता येईल. मौज म्हणजे तेही काम दस्तएवस्कीने ठिकठिकाणी उरकून टाकले आहे आणि मोठ्या सामर्थ्याने त्याने ते केले आहे. खरी भीती ही आहे, की या विधानाचे गांभीर्य आणि खोली किमान गरजा भागलेल्या आणि स्थिरस्थावर असलेल्या माणसांना जाणवणारच नाही. त्यासाठी त्यांना निदान दस्तएवस्कीच्या कादंबऱ्या तरी ' चाळाव्या ' लागतील.

दस्तएवस्कीचे तत्त्वज्ञान साधारणतः दोन ( वा तीन ) दिशांनी वाटचाल करताना, विकसित पावताना दिसते. पहिली दिशा ही बंडाची दिशा आहे. हत्येची दिशा आहे. रास्कोलनिकोफ, पीटर बेरहोवेन्स्की, इवान कारामाझोप हे या दिशेने जाणारे वाटसरू आहेत. तर दुसरी दिशा नव्या माणसाच्या सामान्य निर्मितीची आहे. सोनिया, प्रिन्स मिश्किन, माकार मिखाईल, झोसिमा हे या दिशेने वाटचाल करणारे महात्मे आहेत. आल्योशा हा आहे या स्वरूपात याच दुसऱ्या दिशेने जाणारा वाटसरू आहे.

तिसरी दिशा आहे असे म्हणता येत नाही पण तिसरा प्रकार आहे. येथे माणसे आत्महत्या करतात. स्विद्रिगायलोप, किरिलोफ, इपोलित, स्तावरोजिन, स्मेर्द्याखोप, ही या प्रकारची माणसे आहेत. यांत स्विद्रिगायलोफ सर्वांत ' काव्यात्म ' आहे तर किरिलोफ सर्वांत ' वैचारिक टोकाला ' जाणारा आहे. दोघेही अविस्मरणीयच.

या दोन्ही, तीनही प्रवाहांचे दर्शन प्रथम कोठे घडते ते ' अंडरग्राऊंड ' मधील नायकात. तो 'उगमस्थाना ' सारखा आहे. तो बंड करून उठतो तेव्हा ' रास्कोलनिकोफ ' होतो. ख्रिश्चन आणि मानवतावादी होतो तेव्हा माकार दोलगोरुकी होतो आणि अगतिक होऊन आत्महत्येकडे वळतो तेव्हा स्विद्रिगायलोफ होतो. सुप्तपणे तो 'सर्व' जण आहे.

पहिली दिशा बंडाची (Revolt) आहे, आणि क्रांतीची ( Revolution ) आहे. दस्तएवस्की फ्रेंच राज्यक्रांतीनंतरच्या ' समाजवादी ' कालखंडात तरुण म्हणून वावरला. तरी त्याचे विचार सामाजिक क्रांतीकडे फारशा आशेने वळत नाहीत. त्याला आकर्षून घेते ती व्यक्तिगत जीवनातील मेटॅफिजिकल क्रांती आणि त्यामुळेच तो रास्कोलनिकोफ रंगवितानादेखील, म्हणजे आल्बेर्तो मोरावियो ज्याला ' महाविद्यालयीन प्रोलेटारियट ' म्हणतो त्याचे चित्रण करतानादेखील सामाजिक विश्लेषण करण्यावर भर देत नाही. तो भाग दुय्यमच राहील अशी तो काळजी घेतो.

घातकी उठाव (violent rebellion) करण्याचा व्यक्तिमात्राला हक्क आहे की नाही ? हे स्वातंत्र्य आहे की नाही ? हे आहे, असे रास्कोलनिकोफचे उत्तर आहे. आल्योना 'दुष्ट' आहे म्हणून तो तिला ठार करतो. स्वतःच्या ' कल्पने 'साठी तो एका मानवी जिवाची हत्या करतो. या हत्येचे समर्थन करणारे रास्कोलनिकोफचे विचार असे आहेत—

माणसांचे दोन प्रकार पडतात. सामान्य माणसे आणि अ-सामान्य माणसे. सामान्य माणसे सनातनी व भित्री असतात. ती वारसा जतन करतात. पुनरुत्पादन हे त्यांचे कार्य. ते समाजाने मान्य केलेले नीतिनियम पाळतात. उलट, असामान्य माणसे, ही फार थोडी असतात. ती धाडसी असतात आणि ' नवा शब्द ' उच्चारतात. नीतिनियम ओलांडून जातात. ही माणसे त्या अर्थाने मुळातच गुन्हेगार असतात. या माणसांमुळेच समाजाचे भले होते, प्रगती होते. उदा., महंमद पैगंबर आणि नेपोलिअन. अशा महामानवांना खूनदेखील करण्याचे स्वातंत्र्य असते. ते अनेक लोकांची हत्या मन विचलित होऊ न देता करू शकतात. असामान्य माणूस ' सत्ता ' बरोबर काबीज करतो.

ही भूमिका स्पष्ट करणारा एक लेखही रास्कोलनिकोफ लिहितो. तो छापून आलेला मात्र त्याला माहीत नसतो. पॉर्फिरी व झाम्यातोफशी होणाऱ्या वादात रास्कोलनिकोफ त्याची भूमिका स्पष्ट करतो (या भूमिकेचाच पुढे नीत्शेवरही प्रभाव पडला. )

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रास्कोलनिकोफचे विचार क्रांतिकारकांना पोषक आहेत. पण ते मांडताना त्याच्या डोळ्यांसमोर रूसो, रोबेस्पिएर नसून नेपोलिअन आहे. आणि म्हणूनच झारवर गोळीबार करण्याऐवजी तो म्हातान्या आल्योनाच्या डोक्यात कुदळ घालतो.

रास्कोलनिकोफ अर्थातच खून पचवू शकत नाही. तो नेपोलिअनही नाही हीच खरी वस्तुस्थिती आहे. तो भ्रमिष्ट होतो आणि आजारी पडतो. आणि पॉर्फिरी आणि सोनियाच्या दबावाखाली आणि प्रभावाखाली खून करून ' मोकळा ' होतो. सैबेरियात तुरुंगाची हवा खाण्यासाठी जातो.

रास्कोलनिकोफविषयी आपल्याला सहानुभूती वाटते कारण तो मनाने दुष्ट नाही तो एका ' कल्पनेपोटी ' खून करतो. तो ' बुद्धिवादी ' आहे, पण अपरिपक्व तरुण आहे. खुनी रास्कोलनिकोफच मार्मालादोफ कुटुंबियांना मदत करण्यासाठीही झटू शकतो. त्याने पूर्वी आगीत उडी घालून एका बाई-लाही वाचविले असते हे आपल्याला कळते. मनाने चांगला असल्यामुळेच सोनिया'चा त्याच्यावर प्रभाव पडू शकतो आणि त्याच्यात 'नवा माणूस' जन्माला येतो. अर्थात याला कालावधी जावा लागतो.

पीटर वेरहोवेन्स्की हा ' क्रांति 'कारकच आहे. त्याच्या कृत्यांना सामाजिक आशय आहे. तो समाजवादी क्रांतिकारक आहे. परंतु समाजवादी क्रांती हा सत्तापिपासू हुकूमशाहीचा आकर्षक बुरखा आहे अशी त्याची धारणा असते. हाच त्याचा वास्तववाद. स्वतः ' रोग ' – गुंड – असल्याची कबुली तो स्तावरोजिनजवळ देतो. अत्यंत महत्त्वाकांक्षी माणसे, कार्यक्षम माणसे नेहमी सत्ता ताब्यात घेतात आणि अनियंत्रित हुकूमशहा बनतात. बाकीच्यांना 'समता' देतात; पण ती अखेरीस गुलामगिरीतील समता असते. त्यांना फक्त ' आज्ञापालन ' हवे असते हे पीटर जाणतो. (डेव्हिल्स)

पीटर याही पुढे जातो. लोकांना शिक्षण वगैरे नको असते. त्यांना फक्त किमान गरजांची पूर्ती व्हावी असे वाटते. यासाठीच ' सोशालिस्ट इंटर-नॅशनल ' आणि ' पोप ' यांनी एकत्र यावे असे तो सुचवितो. पीटरचे हे भेदक विश्लेषणच पुढे स्तालीन आणि हिटलर यांच्या विचारांचा पाया बनले नाही काय ? स्तालीनला ज्यासाठी लेनिन हवा होता. त्यासाठीच पीटरला, निकलस स्तावरोजिन हवा असतो. पीटरजवळ धाडस, क्रौर्य व सत्ताकांक्षा आहेत तर स्तावरोजिनजवळ विशाल अंतःकरण व लोकांना आकर्षन घेण्याचे सामर्थ्य ही आहेत.

अर्थातच पीटर अनेक हत्यांना, दंगलीला व जाळपोळीला कारणीभूत होतो. तो 'डेव्हिल' –सैतानच–असतो. परिणामी स्तावरोजिनला आत्महत्या करण्याची पाळी येते. पीटर हा रास्कोलनिकोफची पुढची पायरी या अर्थाने, की त्याच्याजवळ बुद्धीबरोबरच न मोडणारी इच्छाशक्ती व खंबीर मनदेखील आहेत. तो खून पचवू शकतो; एवढेच नव्हे, तर फेदकासारखा खुनीदेखील यशस्वीपणे वापरून घेऊ शकतो आणि स्वतःवर शेकते आहे हे पाहताच पीटर पसार होतो.

इवान कारामाझोफ ही दस्तएवस्कीच्या 'क्रांति'-विचाराची शेवटची पायरी. असे रास्तपणे मानले जाते, की आल्योशा हाही पुढे ' कारामाझोफ ब्रदर्सच्या' भावी तिसऱ्या खंडात क्रांतिकारक होणार होता; परंतु हा खंड अर्थातच ( दस्तएवस्की मृत्यू पावल्यामुळे ) लिहिला गेला नाही. त्यामुळे आहे या परिस्थितीत इवान हाच शेवटची पायरी. इव्हान हा प्रगल्भ आणि प्रभावी क्रांतिकारक 'रेबेल' होय, यात शंकाच नाही.

आल्बेर काम्यूने दाखविल्याप्रमाणे इवान हा हा ' मेटॅफिजिकल रेबेल ' आहे.' इवानचे क्रांति-विचार असे–

ईश्वर ठीक आहे. तो असेना का ! भांडण त्याच्याशी नाही. दुष्ट व अन्यायकारक आहे ती त्याने निर्माण केलेली सृष्टी.

सत्य विरुद्ध न्याय असा संघर्ष कल्पून इवान न्यायासाठी आवाज उठवितो. त्याला लहान बालकांना होणाऱ्या यातना व त्यांच्या डोळ्यांतील आसवे भेडसावतात. तो नैतिक मूल्यांसाठी ईश्वर आणि मुक्ती नाकारतो. ईश्वर हा प्रेमाचा स्रोत आहे हेच त्याला पटत नाही.

जगात ईश्वरच नसेल तर काहीही करायला माणूस मोकळा ( फ्री ) आहे, असे तो मानतो. म्हणजे ही मोकळीक हे पूर्ण स्वातंत्र्य ठरते. आणि काहीही करायला माणूस मोकळा आहे म्हणून

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

इवान वडिलांचा खून होऊ देतो, ह्या खुनात बुद्धयाच सहभागी होतो.

ईश्वर न मानणारा माणूस हा बंडखोर–रेबेल–होय. पण हा माणूस स्वतःच ईश्वर होण्याचा प्रयत्न करतो, ही काम्यूच्या मते मेटॅफिजिकल क्रांती होय. आणि स्वतः ईश्वर होणे याचाच अर्थ गुन्हा ( crime ) स्वीकारणे. गुन्हेगारही होणे.

अशा क्रांतीकडे नेणारे स्वातंत्र्य स्वीकारण्यापेक्षा लोक हुकूमशाही स्वीकारतात. ग्रँड इन्क्विझिटर हा असा हुकूमशहा आहे. भौतिक आणि अधिभौतिक हुकूमशहा. तो लोकांना भाकरी देतो आणि त्यांचे मूलभूत आस्तित्वात्म स्वातंत्र्यच हिरावून घेतो. तो लोकांना जादू, चमत्कार आणि अधिकार यांच्या जोरावर काबूत ठेवतो.

दस्तएवस्कीच्या इवानचा पुढे नीत्शेवर कसा प्रभाव पडला आहे, हे सहज समजण्यासारखे आहे. स्वतः ईश्वर होण्याचा प्रयत्न नीत्शेचा सुपरमॅन (ओबेर-मान) करतोच. आणि नीत्शेसमोरही नेपोलिअन आहेच !

दस्तएवस्कीचे हे नायक आणि तत्त्वज्ञान विशिष्ट सामाजिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर आकार धारण करतात आणि ती परिस्थिती काही प्रमाणात ते आकार तसे निर्माण करण्यास कारणीभूत ठरते. हे नायक निसर्ग आणि समाज यांच्यापासून तुटून दूर पडलेले असतात. अंडरग्राऊंडमधील नायक या सर्वांचा पूर्वसूरी आहे. नव्याने वाढत जाणाऱ्या बकाल पीटर्सबर्गमध्ये तो राहतो, एका टिचुकड्या खोलीत. ही खोली शवपेटिकेसारखी असते. अर्कादीला खोलीत तर धड सरळ उभे राहणेही कठीण जाते. या नायकांचे कुटुंबसंस्थेशी नातेच उरलेले नसते. कारण त्यांची कुटुंबेच अपघाताने घडलेली असतात. ती विघटित होणेच जास्त स्वाभाविक. कुठे आई नसते तर कुठे बाप. इवान वडील असूनही पोरका, नेहमी घरापासून दूर दूर असतो. 'रॉ यूथ' मध्ये तर कुटुंबातील कोणीच एकमेकांशी संवाद साधू शकत नाहीत. आधुनिक जीवनाची नेमकी नस पकडणारा, दस्तएवस्की अगदी सुरुवातीचा लेखक होय. फ्लोबर आणि इब्सेनमध्ये 'एकाकी जीवन' आणि सामाजिक जीवन यांच्यातील दरीमुळे निर्माण होणारे मानसिक आणि नैतिक दुष्परिणाम महत्त्वाचे ठरतात; परंतु दस्तएवस्की ही समस्या सर्वांगाने चित्रित करतो.

एकाकीपणा, दारिद्र्य आणि बेकारी यांनी ग्रास-लेले हे नायक बंडखोरीचे, इच्छाशक्तीचे विकृत तत्त्वज्ञान निर्माण करतात. दस्तएवस्कीचे आधुनिक तत्त्वज्ञानात नेमके याच तत्त्वज्ञानामुळे नाव झाले आहे. आधुनिक जीवनातील ही परात्मता आणि त्या परात्मतेमुळे निर्माण होणारे जीवनविषयक विकृत विचार त्याने नेमके टिपलेले आहेत. हे तत्त्वज्ञान मांडणारे किंवा ही परिस्थिती भोगणारे फक्त पुरुषच आहेत असे नाही. लिझा खोखलाकोफ, नास्तास्या, यांसारख्या स्त्रियाही त्यात आहेत. ग्रूशेकाला हिशेब-नीसाचे काम मिळालेले असले, तरी ती असेच जीवन जगते, एकाकी आणि परात्म. बकाली आणि दारि-द्र्यातून गुन्हेगारीकडे कसा प्रवास होतो याची वर्णने डिकिन्झ आणि व्हिक्तोर ह्यूगो करतात पण ती बव्हंशी बाहेरून केलेली आणि भावविवश वर्णने आहेत. दस्तएवस्की अंतरंगात शिरतो आणि या परिस्थितीतून तत्त्वज्ञाने कशी जन्म घेतात व अक्राळ-विक्राळ रूपे धारण करतात ते रंगवितो. नुसती भावविवश वर्णने आणि भेडसावणारे तपशील यांचा वापर तो क्वचितच करतो.

असे समजण्याचे कारण नाही, की या क्रांतितत्त्व-ज्ञानाविषयी आणि ते मांडणाऱ्या पात्रांविषयी दस्त-एवस्कीला काहीच वाटत नव्हते. दस्तएवस्कीचेच हे विचार आहेत आणि ह्या व्यक्तिरेखाही त्याच्याच आहेत. जिवंत आणि उत्कट. अतिशय आत्मीयतेने त्या त्याने उभ्या केल्या आहेत. तटस्थ अलिप्त राहून त्या रंगविल्या आहेत असे अगदी कोठेही वाटत नाही.

तत्त्वचिंतनाची-मंथनाची दुसरी दिशा 'ख्रिश्चन' आहे. हे बंधुत्वाचे, विश्वबंधुत्वाचे तत्त्वज्ञान आहे. क्रांति-विचार प्रामुख्याने नकारात्म, गडद व विध्वं-सक आहे तर हे तत्त्वज्ञान होकारात्म, आणि विधायक असून दिलासा देणारे आहे. बायबलचा 'नवा करार' आणि ख्रिस्ताची 'रशियन' प्रतिमा हे या तत्त्वज्ञानाचे प्रमुख आधार होत. सोनिया, मिखाईल, झोलिमा, माकार दोलगोरुकी, मिशिकन आणि आल्योशा हे त्याचे प्रमुख आविष्कार व प्रवक्ते होत.






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'सत्यधर्म आणि संतधर्म यांच्यांतील एकच निवडायची वेळ आली, सत्य ख्रिस्ताला सोडून गेले तर मी ख्रिस्ताजवळच राहीन आणि संतधर्मच माझा मानीन' हा उद्‌गार या सर्व व्यक्तींचा उद्‌गार आहे. पण या संतधर्मात चांगुलपणा, माणुसकी, क्षमाशीलता यांच्या बरोबरीनेच सौंदर्याचीही महती त्याने मांडलेली आहे हे विसरता कामा नये.

भारतीयांना दस्तएवस्कीचा हा सर्व विचार जवळचा वाटावा असा आहे. तरी तो विशेष जवळचा वाटावा याला एक खास कारण दिसू शकते. ते म्हणजे दस्तएवस्कीने 'साक्षात्कार' या मनोघटिताचा या संदर्भात केलेला वापर हे होय. त्याचे बंधुत्व आणि नवजीवन 'साक्षात्कारी' आहेत. दस्तएवस्की 'संत' आहे असे म्हटले, तर तो 'साक्षात्कारी' संत आहे असेही म्हणावे लागेल. पण हा साक्षात्कार परमात्म्याचे दर्शन घडवीत नाही तर माणसामाणसांतील, मूलभूत बंधुत्वाचे, गूढ नात्याचे दर्शन घडवितो.

साक्षात्काराचे पहिले महत्त्वाचे वर्णन 'क्राईम अ‍ॅण्ड पनिशमेंट'मधील उपसंहारात येते. एका पहाटे हा साक्षात्कार रास्कोलनिकोफमध्ये नवा माणूस जागा करतो आणि नवे जीवन निर्माण करतो–

"ते कसे घडले हे त्याला कळले नाही. अचानक कोणत्या तरी शक्तीने त्याचा ताबा घेतला आणि तिने त्याला तिच्या (सोनियाच्या) पायावर घातले. त्याने तिच्या गुडघ्यांना मिठी मारली आणि तो रडू लागला. प्रथम ती विलक्षण भेदरली आणि तिचा चेहरा मरणोन्मुख अवकळेने व्यापला. ती उसळून उभी राहिली. तिचे सर्वांग थरथरत होते. तिने त्याच्याकडे पाहिले. उत्कट समाधानाने तिचे नेत्र चमकून उठले. तिला उमगले. कसलीही शंका तिच्या मनात उरली नाही. तो तिच्यावर प्रेम करीत होता. अगदी निस्सीम प्रेम. ज्या क्षणाची ती इतक्या दीर्घ काळ वाट पाहात होती तो क्षण आला होता.

"त्यांना एकमेकांशी बोलायचे होते खरे; पण ते शक्यच झाले नाही. त्यांच्या डोळ्यांत आंसू उभे राहिले. ते दोघेही फिकट आणि कृश झाले होते; परंतु त्या आजारी आणि पांढुरक्या चेहऱ्यांवर एका नव्या भविष्यकाळाची, पूर्ण पुनरुज्जीवनातून निर्माण झालेल्या एका नव्या जीवनाची पहाट चमकू लागली होती. त्यांना जीवनाकडे माघारी घेऊन आले होते ते प्रेम होते. कधीच ओसरणार नाही इतके चैतन्य त्यांची हृदये आता एकमेकांना देणार होती."

हा खास दस्तएवस्कीय 'साक्षात्कार' आहे. दोघांचे मिलन तो घडवून आणतो आणि या मिलनातून नवजीवनाची निर्मिती होते.

दुसरे वर्णन 'इडियट'मध्ये येते. प्रिन्स मिश्किनच्या मनोवस्थेचे हे वर्णन आहे–

"फेफऱ्याची चक्कर येण्यापूर्वीचे एक मिनिट असे काही असे, की ते त्याला नेहमी आठवे (अर्थात चक्कर जागेपणी आली तर). औदासिन्यात, आध्यात्मिक अंधारात आणि दडपलेपणात काही वेळा मेंदूत काही क्षण, प्रकाश लखलखून जात असे. आणि एका विलक्षण चेतावणीमुळे त्याच्या सर्व चैतन्यशक्ती अगदी वरच्या पट्टीत कार्य करू लागत असत. जगण्याची भावना, स्वतःविषयीची जाणीव ही, या वीज लखलखून जाण्याच्या क्षणी दसपट तीव्र होत. त्याचे मन आणि अंतःकरण विस्मयजनक प्रकाशाने ओसांडून जात. त्याचा सारा अस्वस्थपणा, सर्व साशंकता, सर्व दुश्चिंता एकदम संपल्यासारख्या होत. उदात्त शांती, निरायम आणि सुसंगतिपूर्ण आनंद, उल्हास आणि आशा यांत ती विसर्जन पावत. परंतु ज्या क्षणापासून चक्कर सुरू होई, त्या क्षणापूर्वीची ही फक्त प्रस्तावना ठरे. मग चक्कर येण्याचा क्षण येई. ती चक्कर मात्र असह्य असे. चक्कर ओसरून सारे काही पूर्ववत् झाल्यावर तो त्या आनंदाच्या क्षणाचा विचार करी तेव्हा स्वतःला सांगायचा, जीवनाच्या आणि स्वतःच्या जाणिवेचे ते अत्युच्च संवेदन, अस्तित्वाच्या अत्युच्च प्रकारचे ते किरण आणि तो झगमगाट कसला तरी रोग असावा झाले! सामान्य मनोवस्थेतील विघाड असे असतात. त्यांच्यामुळे असण्याची अत्युच्च अवस्था नव्हे तर उलट अतिखोल अवस्था मात्र प्राप्त होते."

हा साक्षात्कार फक्त स्वतःशीच आणि जीवनाच्या नात्याशी निगडित आहे. म्हणजे त्यात दोन माणसे जोडली जातात असे प्रत्यक्ष घडत नाही. ते परिणाम म्हणून घडते आणि तेही अप्रत्यक्षरीत्या. अर्थात येथेही विकार आणि मनाची रुग्णावस्था यांचा संदर्भ आहेच.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साक्षात्काराचे तिसरे महत्त्वाचे वर्णन ब्रदर्स कारामाझोफमध्ये येते. हे वर्णन सर्वांत प्रभावी व निर्णायक वाटते–

" आल्येझा उभा राहिला. इकडे तिकडे पाहत राहिला. आणि अचानक त्याने स्वतःला जमिनीवर झोकून दिले. जणू त्याचे पायच छाटले गेले.

" त्याने पृथ्वीला आलिंगन का दिले हे त्याला कळले नाही. तिचे चुंबन त्याला का घ्यावेसे वाटले याची कारणमीमांसा करण्याच्या भानगडीत तो पडला नाही. त्याला साऱ्याच भूमीची चुंबने घ्यावीशी वाटली. रडत रडत त्याने ती घेतली आणि माती अश्रूंनी भिजवून टाकली. हर्षोन्मादाने त्याने तिच्यावरील आपले चिरंतन प्रेम व्यक्त केले. ' आनंदाश्रूंनी पृथ्वी भिजवून टाक आणि तुझ्या आनंदाश्रूंवर प्रेम कर ' हे शब्द त्याच्या अंतर्मनात घुमले. तो रडत कशासाठी होता ? ओह्, त्याच्या आनंदाच्या भरात, गडद अंधःकारात चमचमणाऱ्या ताऱ्यांसाठी तो रडत होता. या भावनांच्या कल्लोळाबाबत तो काही शरमिंदा झाला नव्हता. ईश्वराच्या अनेक जगतांतील धागे त्याच्या आत्म्यात जणू एकाच वेळी एकत्रित आले होते आणि या विश्वस्पर्शामुळे त्याचा आत्माच थरथरत होता. प्रत्येकाला प्रत्येक गोष्टीबद्दल क्षमा करावी, स्वतःसाठी नव्हे, तर प्रत्येकासाठी सर्व गोष्टींची क्षमा मागावी असे त्याला वाटत होते. ' माझ्यासाठी क्षमा, मी नव्हे तर इतरजण मागतील ' हे शब्द त्याच्या अंतरंगात निनादले. प्रत्येक क्षणी त्याला स्पष्टपणे, निश्चितपणे जाणवले, की वरच्या आकाशाच्या घुमटाप्रमाणे असे काहीतरी खंबीर आणि भक्कम त्याच्या आत्म्यात प्रवेश करीत होते. एक कल्पनेप्रमाणे असलेले काहीतरी त्याच्या मनात रोवले जात होते. आणि ' ते ' केवळ त्याच्या साऱ्या आयुष्यात नव्हे तर अगदी चिरंतन काळपर्यंत तेथेच राहणार होते. तो जमिनीवर पडला तो एक अननुभवी तरुण म्हणून, आणि उठला तो उरलेल्या आयुष्यभरासाठी एक खंबीर योद्धा म्हणून. त्याला हे सारेच जाणवले. आनंदाच्या त्या क्षणी अचानकपणे जाणवले. उरलेल्या आयुष्यात अगदी कधी म्हणजे कधीही आल्येशा तो क्षण विसरू शकला नाही. त्या क्षणी कोणीतरी माझ्या आत्म्याला भेटले असे तो पूर्ण आत्मविश्वासाने नंतर सांगत असे " ( ब्र. का., भाग सात, प्रकरण चार ).

आल्येशाचा साक्षात्कार विशुद्ध आहे. त्यात आजारीपणाचा किंवा मनोविकृतीचा भाग काही नाही. हा साक्षात्कार असे सुचवितो, की तो फादर झोसिमाचा वारसा आणि कार्य पुढे नेऊ शकणार आहे.

भारतीय साक्षात्कारपरंपरा मुक्ती आणि सिद्धी यांच्याकडे घेऊन जाऊ पाहते. या परंपरेची माहिती दस्तएवस्कीला असण्याची शक्यता नव्हती. पण त्याचा बौद्ध-धर्माचा परिचय होता. दस्तएवस्कीचा ' साक्षात्कार ' हा जीवनाकडेच घेऊन जातो. माणसामाणसांतील संबंध प्रेममय आणि निर्मळ होण्याची शक्यता त्याच्यामुळे निर्माण होते. कारण हा ' साक्षात्कार ' व्यक्तीच्या अंतःकरणातच पालट घडवून आणतो. दस्तएवस्कीच्या तत्त्वज्ञानातील हा भाग असा आहे, की युरोप आणि पूर्व यांच्यांतील तो दुवा वाटावा.

माकार, आल्येशा, झोसिमा, मिखाईल यांसारख्या विलक्षण व्यक्तिरेखाही भारतीयांना 'आपल्याकडील' वाटाव्यात अशाच आहेत. मौज ही आहे, की अशा व्यक्तिरेखा इतक्या समर्थपणे मात्र कोणी भारतीय कादंबरीकार निर्माण करू शकलेला दिसत नाही. अगदी शरदबाबूंमध्येही या सामर्थ्याच्या व्यक्तिरेखा आढळत नाहीत.

' ख्रिश्चन तत्त्वज्ञान ' हा दस्तएवस्कीच्या एकंदर विचार-मंथनातील एक स्थिर घटक राहतो. चर्चची इमारत कधीही दृष्टिआड होत नाही. ही ख्रिश्चॅनिटी मात्र नव्या करारातील ख्रिश्चॅनिटी आहे.

मेलेला माणूस उठविणे (उदा., लाझारस) हे ख्रिस्ताला शक्य असते. किंवा ख्रिस्ताच्या अनुयायाला शक्य असते. दस्तएवस्की याचा वाच्यार्थ घेत नाही, व्यंग्यार्थ घेतो. दुष्टतेच्या गर्तेत कोसळलेल्या, गुन्हा, खून करून 'मेलेल्या' माणसाला उठविणे आणि परत जीवनात आणणे यालाच तो 'रिसरेक्शन ' समजतो. त्यामुळेच सोनिया रास्कोलनिकोफला जिवंत करते तर माकार, वेर्सिलोफ आणि आर्कादी या पितापुत्रांना नवजीवन देण्याचा यत्न करतो. झोसिमा मिखाईलला माणसात आणतो



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तर आल्येशा त्याच्या भावाला, मित्या कारामाजोफला वाचवितो आणि कोल्या क्रासोतकीनमधील निरागसता जागवितो. प्रिन्स मिश्किन, नास्तासियाला शब्दशः वाचविण्याचा प्रयत्न करतो. हे दुसऱ्याला पुनश्च माणसांत आणण्याचे काम, नवजीवन प्राप्त करून देण्याचे कार्य 'साक्षात्कारी' माणसे करू शकतात असा दस्तएवस्कीचा अभिप्राय दिसतो. अशाच माणसांचा प्रभाव पडू शकतो, असे तो मानतो.

अशी माणसे जेव्हा नसतात, तेव्हा फक्त विध्वंसन होते. 'दि डेव्हिल्स'मध्ये नेमके हेच घडते. दैवी अंश असलेले कोणीच त्या जगतात नसल्याने फक्त दुष्ट कृत्यांची मालिकाच वाढत जाते. आणि 'दि गॅम्बलर' मध्येही तसाच प्रकार घडतो. श्रद्धा आणि प्रेम यांच्यांतूनच 'नवजीवन' निर्माण होऊ शकते हे दस्तएवस्कीच्या तत्त्वज्ञानाचे जणू सार आहे. श्रद्धा ही अर्थातच ख्रिस्तावरील आणि प्रेम हे माणसामाणसांतील होय.

स्विद्रिगायलोफ काय किंवा स्तेपान निकोलायविच काय, नास्तासिया काय किंवा वालकोवस्की काय ह्या विलक्षण प्रत्ययकारी व्यक्तिरेखा आहेत; पण त्या दस्तएवस्कीचे तत्त्वज्ञान व्यक्त करीत नाहीत आणि रेखाटतही नाहीत. ही सर्व रोमँटिक तत्त्वज्ञान जगणारी रोमँटिक माणसे आहेत. दस्तएवस्की त्यांचा टीकाकार आहे.

मानव हे दस्तएवस्कीच्या तत्त्वमंथनाचे केंद्र आहे. त्याचे तत्त्वज्ञान व्यक्तिवाद–पर्सनॅलिझम–म्हणून वर्णिले जाते ते रास्त आहे, परंतु हे लक्षात घेतले पाहिजे, की माणूस हे तो स्वायत्त निरपवाद मूल्य मानीत असला तरी माणूस, माणूस म्हणून त्याला एकाच वेळी सुष्ट आणि दुष्ट वाटतो. अमूल्य आणि भीतिदायक वाटतो.

'Aber das schrecklichte der
Schrecken
Das ist der Mensch in seinem
Wahn'

या त्याच्या सर्वांत आवडत्या कवीच्या, शिलरच्या ओळी त्याच्या दृष्टिकोनाची अचूक कल्पना देतात. या दृष्टीमुळेच तो आल्येशा आणि स्मेर्द्याखोफ, प्रिन्स मिश्किन आणि रोगोझिन यांसारख्या टोकाच्या सुष्टदुष्ट व्यक्ती सारख्याच ताकदीने रंगवितो. या बाबतीत तो शेक्सपीयर, ग्योएथे यांच्याच पठडीतील आहे.

दस्तएवस्कीचा व्यक्तिवाद नैतिक स्वरूपाचा आहे असे व्ही. व्ही. झेंकोवस्की म्हणतो. याचा अर्थ माणसाचे विश्लेषणातीत गुण त्याच्या कृतीत, कामगिरीत नसून ते बालकाच्या सुप्त शक्तीत आहेत असे दस्तएवस्कीला अभिप्रेत असावे असा तो स्पष्ट करतो. आस्तित्ववादाच्या दृष्टिकोणातून दस्तएवस्कीचा सर्वमान्य, व्यक्तिवाद माणसाच्या मानसशास्त्राशी संबंधित नसून त्याच्या ऑन्टॉलजीशी निगडित आहे; म्हणजे त्याच्या सारतत्त्वांशी 'इसेन्सशी' निगडित आहे. आणि असे असले तरी या व्यक्तिवादाला नैतिक म्हणायचे कारण हा वाद माणसातील सुष्टदुष्ट शक्तींच्या **संघर्षावर** लक्ष केंद्रित करतो.

माणूस निसर्गाचाच भाग आहे; पण तो **स्वतंत्र** आहे म्हणजे निसर्गापासून देखील स्वतंत्र आहे, असे दस्तएवस्की मानत असावा. परंतु खरे म्हणजे दस्तएवस्की या मुद्द्यावर स्पष्ट नाही. त्याचे "क्षणोक्षणी आपण चाकाचा दाता (कॉग) नसून माणूस आहोत हे स्वतःपुढेच सिद्ध करणे यातच माणसाची सारी कामगिरी सामावलेली आहे" हे अंडरग्राऊंड मधील वाक्य माणूस निसर्गापासून स्वतंत्र आहे हे दाखविणारे नाही. कॉग मशीनमध्ये असतो, निसर्गात नव्हे.

खरे म्हणजे निसर्ग आणि माणूस यांच्यांतील नाते दस्तएवस्की समाधानकारक रीत्या मांडूच शकलेला नाही. माणसाचे महत्त्व, मोठेपण तो निसर्गाचे अपत्य आहे यात नाही, तर त्याच्या **स्वातंत्र्यात** आहे; म्हणजेच त्याच्या नैतिकतेत आहे हे त्याचे मत ठीक आहे. दस्तएवस्कीचा ज्येष्ठ समकालीन विचारवंत हर्झेनचा विचार असाच होता. परंतु याचा अर्थ माणूस आणि निसर्ग यांच्यांतील मूलभूत अतूट नाते नाकारणे अथवा स्पष्टपणे समजावून न घेणे असा होऊ नये. पण दस्तएवस्की या मुद्द्यावर खोल चिंतन करताना दिसत नाही. चेर्नीशेवस्की, लावरोव, मिखाइलोवस्की हे समकालीन (सेमी पॉझिटिविस्ट) विज्ञानवादी, त्याच्या समोर होते आणि त्यांच्या विरुद्ध तो

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असल्याने हे असे झाले असावे. 'अंडरग्राऊंड' मध्ये तर तो निसर्गवादाची खिल्ली उडवितानाच दृष्टीस पडतो.

मनुष्य बुद्धिवादी–रॅशनल–आणि स्वतःला उपयुक्त ठरेल असेच वागणारा आहे ही तत्कालीन उपयुक्ततावादी भूमिका त्याला हास्यास्पद वाटते, (अंडरग्राऊंड) आणि तो या भूमिकेवर हल्ला चढवितो.

"माणूस हा उधळ्या प्राणी आहे. तो स्वतःच्या फायद्याचे ठरेल असे क्वचितच वागतो; कारण माणसाचा स्वभाव त्याच्या वागण्यातून पूर्णपणे कार्यकारी होतो, जाणूनबुजून त्याचप्रमाणे नकळत, अबोधपणे." किंवा "तर्कबुद्धी आणि वासना कदाचित एकत्रित येतातही ... पण बहुतेक वेळा वासना, तर्कबुद्धीच्या अगदी खंबीरपणे विरोधात जातात." किंवा "मला जगावेसे वाटते; कारण माझ्या जगण्याच्या संपूर्ण कुवतीचे समाधान व्हावेसे वाटते. फक्त माझ्या बौद्धिक कुवतीचे समाधान व्हावे म्हणून नव्हे. बौद्धिकता फक्त फक्त माणसाच्या बौद्धिक शक्तीचे समाधान करते. परंतु इच्छाशक्ती (desire) संपूर्ण जीवनाचा आविष्कार होय." यांसारखी "दि नोट्स फ्रॉम अंडर ग्राऊंड" मधील विधाने दस्तएवस्कीची भूमिका स्पष्ट करतात. आणि या विधानांच्या प्रकाशात नास्तासियाचे विस्तवात नोटा फेकणे आणि ते गान्याला काढायला सांगणे, अंडर ग्राऊंड मधील नायकाचे लिझाला घरी बोलावणे, किंवा स्तावरोजिनचे उपस्थित मंडळीपैकी एकाचे नाक ओढणे यांसारखी अनेक खास दस्तएवस्कीय ढंगाची कृत्ये आपण समजावून घेऊ शकतो.

बुद्धिवादाची मानवविषयक भूमिका चूक ठरविणारा दस्तएवस्की नुसता इच्छाशक्तीचा (Desire) गौरव करून थांबत नाही; तर तो अबौद्धिक शक्तींचे महत्त्वही मांडतो. Irrationalism मांडतो. यात त्याचे मोठेपण आहे. अ-तार्किक अ-बौद्धिक वागणुकीतून माणसाच्या गूढ शक्ती व्यक्त होतात आणि त्या माणूस मूलतः कसा विस्कळीत (disorganise) आहे हे दाखवून देतात. मानवी स्वातंत्र्य नुसते तसे असत नाही, तर ते अ-बौद्धिक शक्ती अभिव्यक्त करते, माणसाचे अबोध मन व्यक्त करते हा पुढे फ्रॉईडप्रणीत मनोविश्लेषणाला प्राणभूत ठरलेला विचार दस्तएवस्कीने या ठिकाणी थोड्या वेगळ्या स्वरूपात मांडला आहे.



बौद्धिक–रॅशनल–स्वातंत्र्य असे असतेच. परंतु दस्तएवस्कीच्या मते काही माणसे इतकी स्वतंत्र असतात म्हणजे इतकी इर्रॅशनल असतात की, तो स्वतःचा मृत्यूदेखील निवडतात. उदाहरणार्थ, डेव्हिल्समधील किरिलोफ. याचे कारण? याचे कारण हे, की बुद्धिजीवी–रॅशनल–माणसात एक भूमिगत–अंडरग्राऊंड–माणूस दडलेला असतो. संस्कार, संस्कृती आणि परंपरा यांनी स्पर्शही न केलेला माणूस. त्याच्यात 'गोंधळ' –choas–असतो, अनागोंदीपणा असतो. दुष्ट, गुन्हेगार प्रवृत्ती या भूमिगत माणसात वास करीत असतात. रास्कोलनिकोफ हा सर्व चिकित्सा, विश्लेषण करतो आणि त्याच्यातील भूमिगताला वाव देतो. मनातील हा भूमिगत प्रबळ असल्यामुळेच शिक्षा भोगीत असताना देखील बराच काळ त्याला पश्चात्ताप असा होत नाही. स्वातंत्र्य हे चांगल्यावाईटापेक्षा– सुष्टदुष्टतेपेक्षा– मूलभूत आहे आणि ते या भूमिगत माणसाशी माणसातील आदिमतेशी (?) निगडित आहे हे दस्तएवस्की प्रभावीपणे दाखवितो.

स्वातंत्र्य न–नैतिक ठरते; कारण ते या भूमिगत माणसाशी निगडित असते हा विचार दस्तएवस्कीला इतका भेडसावून सोडतो आणि इतक्या खोलवर जाणवतो, की प्रेमाच्या प्रेरणेच्या आधाराखेरीज स्वातंत्र्याला विधायक सर्जनशील रूपच येत नाही हे तो वारंवार बजावीत राहतो. प्रेमाशिवाय स्वातंत्र्यात 'मृत्यूचे बीज' अंकुरते असे तो म्हणतो.

'रिकामे मन सैतानाचे घर' ही म्हण बदलायची झाल्यास दस्तएवस्की 'प्रेमाशिवाय मन सैतानाचे घर' अशी बदलेल. स्वातंत्र्य जेव्हा अशा रिकाम्या एकाकी मनाला भेटते तेव्हा त्याच्यात दडलेला गोंधळ–chaos–उघडकीस येतो आणि माणसातील सत्प्रवृत्ती गुदमरून जातात. या ठिकाणी ईश्वरभावच नसतो. हे कसे घडते हे पाहायचे असेल तर त्याने रास्कोलनिकोफचा मानसिक प्रवास पाहावा, अभ्यासावा. दुष्टता किती खोलवर दडलेली असते हे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपणास कळू शकते. रास्कोलनिकोफ तर सोडाच, पण मिश्किनमध्येही अशी दुष्टता दडलेली आहे. मनाने हादरलेला मिश्किन रोगोझिनचा सूड घेतो काय? सूडाने विचार त्याच्या मनात येतात काय? छे! उलट तो प्रेताशेजारीच त्या रोगोझिनच्या खोलीत झोपतो. 'दुष्टता ( Evil ) माणसाच्या मनात वाटते त्यापेक्षा जास्त खोलवर दडलेली आहे' ( दि डायरी, १८७७, २-३ ) हे दस्तएवस्कीचे लाडके सत्य आपल्यालाही मनोमन पटते.

या ठिकाणी तत्त्वज्ञानातील नेहमीचा प्रश्न कोणी विचारू शकतो. माणूस मुळात सुष्ट आहे की दुष्ट? दस्तएवस्कीला काय वाटते? असे दिसते, की ( रूसोप्रमाणेच ) दस्तएवस्की माणूस मुळात सुष्ट आहे असे मानतो. पण स्वतःतील सुष्टतेचा आविष्कार होण्यासाठी माणसाने पूजनीय शक्ती शोधली पाहिजे. 'डेव्हिल्स' मधील स्तेपान निकोलायविच वेरहोवेन्स्की म्हणतो, "मानवी अस्तित्वाचा सार्वत्रिक नियम म्हणजे अमर्यादित अशा थोरवीची माणसाने पूजा केली पाहिजे. माणसाला राहण्यासाठी जसा हा छोटासा ग्रह (पृथ्वी) आवश्यक आहे त्याचप्रमाणे अमापनीय आणि अनंत हे देखील आवश्यक आहे." परंतु माणसाची 'सौंदर्यकल्पनाच गढूळ झाली आहे' हे त्याचे दुर्दैव आहे. त्यामुळे "सौंदर्य हे आता देव आणि सैतान यांची रणभूमी झाले आहे" असा विचार 'ब्रदर्स' मध्ये ओघानेच येतो.

माणसाबाबत दस्तएवस्की कितीही 'वास्तववादी' असला, तरी काळाचा परिणाम त्याच्यावर झालेला होताच. समाजाचे भले होईल हे समाजवादी स्वप्न आणि माणसातील सुष्टता फळाला येईल हे रोमँटिक स्वप्न ही दोन्ही त्याने अखेरीपर्यंत जपलेली दिसतात. "त्याच्या हृदयात सर्व माणसांसाठी दडलेले आहे नवजन्माचे रहस्य. आणि हीच शक्ती अखेरीस भूतलावर न्यायाची स्थापना करील" असे आल्येशा फादर झोसिमाविषयी म्हणतो. माणसाविषयी दस्तएवस्कीला जणू हेच म्हणायचे आहे. दस्तएवस्कीचा हा विश्वास आणि ख्रिश्चॅनिटी यांचे नाते आहे हे खरे; परंतु कोणाही वाचकाला दिलासाच हवा असेल तर दस्तएवस्कीचा हा विश्वास दिलासा देऊ शकतो. मग या विश्वासाला कोणी स्वप्नरंजन म्हणोत, की कोणी सौंदर्याधिष्ठित मानववाद म्हणोत.

दस्तएवस्कीचे, माणसाचे आकलन असे आहे, की ईश्वराखेरीज मानव अर्थपूर्ण जीवन जगूच शकणार नाही, असे त्याला वाटते. शातोफच्या 'मी देवावर विश्वास ठेवीन' या शब्दांतील आर्तता ही दस्तएवस्कीचीच आर्तता आहे. Whosoever rejects Godmanhood inevitably tends toward mangodhood हे शब्द दस्तएवस्कीची ईश्वरविषयक अखेरीची भूमिका स्पष्ट करतात. म्हणजे जो शातोफच्या, आल्येशाच्या रस्त्याने जात नाही तो किरिलोफ, स्तावरोजिन यांच्याच रस्त्याने जातो. मधला मार्ग नाही. म्हणजे किर्केगर्द प्रमाणेच दस्तएवस्की देखील एक Either-Or मांडतो.

समाजवाद्यांची निधर्मी समाजरचना त्याला मान्य नाही. कारण ईश्वराला जागा नसणाऱ्या त्या समाजरचनेत प्रेम आणि बंधुत्व यांना स्थान राहणारच नाही, हा त्याचा ठाम विश्वास आहे. फूरिए आणि क्लोद बर्नार यांच्या मवाळ समाजवादाविषयी दस्तएवस्कीचे हे मत; तर मार्क्स किंवा लेनिन यांच्या जगाविषयी, समाजाविषयी तर बोलायलाच नको.

'सौंदर्य जगाला तारील' हा दस्तएवस्कीचा अतिप्रसिद्ध उद्गार त्याच्या सौंदर्यविचाराचे द्योतक मानला जातो. परंतु मौज ही आहे, की दस्तएवस्कीच्या साहित्यात सौंदर्यविषयक चिंतन किंवा चर्चा फारशी नाही. आणि जे काही सौंदर्यविषयक विचार आढळतात, ते त्याच्या एकूण मानवविषयक धारणांशी व्यवस्थितपणे सांधले गेलेले आहेत असे दिसत नाही.

सौंदर्य म्हणजे फक्त स्त्रीचे सौंदर्य एवढेच खरे म्हणजे येते. मिश्किनला एकदोनदा स्वित्झर्लंडमधील एका छोट्या धबधब्याचे सौंदर्य आठवते; पण ते अपवादात्मक समजावे लागेल. आणि सौंदर्य जगाला तारील असे दस्तएवस्की म्हणतो, तरी प्रत्यक्षात म्हणजे कादंबऱ्यांत, त्याचे सौंदर्य दुःख व विनाश यांनाच कारणीभूत ठरताना दिसते. ग्रुशेंकाच्या सौंदर्यामुळेच कारामाझोफ कुटुंबातील 'महाभारत' घडते. नास्तासियाचे सौंदर्यच तिच्या खुनाला कारणीभूत ठरते. सौंदर्यभोक्ता स्विद्रि-

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

गायलोफ अखेरीस आत्महत्या करतो. नाही म्हणायला सोनियाचे सौंदर्य रास्कोलनिकोफला वाचविते असे म्हणता येईल. ही सारी उदाहरणे पाहता, "सौंदर्य ही भयावह आणि थरकाप उडविणारी गोष्ट आहे. सौंदर्यात टोके एकमेकांना भेटतात आणि विसंगती एकत्र येतात. भीतिदायक गोष्ट ही आहे, की जे सद्सद्विवेक बुद्धीला लज्जास्पद वाटते ते अंत:करणाला वाटते विशुद्ध सौंदर्य." हे दिमित्रीचे विधानच दस्तएवस्कीची सौंदर्य-दृष्टी यथार्थपणे व्यक्त करते असे म्हटले पाहिजे. सौंदर्यामुळे माणसाच्या मनात सुष्टदुष्ट शक्तींचा संघर्ष होतो आणि बऱ्याच वेळा हे सौंदर्यच त्याच्या अध:पतनाला कारणीभूत ठरते हा एक जुना समजच दस्तएवस्कीने मांडला आहे.

"मानवजात विज्ञानाशिवाय जगू शकेल, भाकरीशिवाय जगू शकेल, पण ती सौंदर्याशिवाय जगू शकणार नाही. यातच सारे गूढ रहस्य आहे आणि इतिहासाचे सार आहे" स्तेपान निकोलायविचचे रोमँटिक उद्गार असेच फसवे आहेत. ते दस्तएवस्कीची खरी भूमिका व्यक्त करीत नाहीत. कादंबऱ्यांतील घडामोडी, पात्रे, वर्णने यांतून या श्रद्धेला आधार सापडत नाही.

कलेविषयी दस्तएवस्कीची भूमिका हो एकोणिसाव्या शतकातील रोमँटिसिझमच्या अधिकृत भूमिकेशी मिळतीजुळती अशीच आहे. शिलरचा त्याच्यावर विलक्षण प्रभाव होता. रेम्याच्या १८६४ च्या एका अंकात तो म्हणतो, – "कलेला तिचे असे एकसंध आणि जैविक जीवन असते असा आमचा विश्वास आहे. खाणे, पिणे याप्रमाणेच कला हीदेखील माणसाची गरजच आहे. सौंदर्याची गरज आणि निर्मिती या गोष्टी माणसाच्या लेखी अविभक्त आहेत... माणसाला सौंदर्याची तहान लागलेली असते आणि तो कुठलीही अट न घालता ते स्वीकारतो. केवळ ते सौंदर्य आहे म्हणून." परंतु हे मत असले आणि स्वत: तो फार मोठा प्रतिभावान साहित्यिक असला, तरी दस्तएवस्कीच्या कादंबऱ्यांत निसर्गदृश्यांची, इमारतींची, पुतळ्यांची, चित्रांची सुरेख आणि रसभरीत वर्णने क्वचितच येतात. निसर्गदृश्यांचा, कलात्मक वस्तूंचा मनावर पडणारा प्रभावही तो बारकाव्याने टिपताना दिसत नाही. याचे कारण त्याची अस्वस्थ आणि धगधगीत प्रतिभा केंद्रित झाली होती माणसाच्या अंतर्मनावर आणि माणसामाणसांतील गुंतागुंतीच्या वेड्यावाकड्या संबंधांवर.

दस्तएवस्कीचे तत्त्वज्ञान हे अखेरीस जीवनाचे तत्त्वज्ञान आहे आणि दस्तएवस्कीचे 'जीवन' म्हणजे श्रद्धा, प्रेम आणि एकमेकांशी बंधुत्वाचे संबंध. ह्याला अभिप्रेत असलेले नवे जीवन आणि नवी पहाट ही या मूल्यांवर आधारलेली आहेत.

'क्राईम अ‍ॅण्ड पनिशमेंट'मधील त्याचे एक वाक्य त्याच्या भूमिकेवर चांगलाच प्रकाश पाडते. Life had taken the place of dialectics, and something quite different had to work itself out in his mind. हे ते वाक्य.

'डायलेक्टिक्स'ने पछाडलेले जीवन ते जीवनच नव्हे. मग तो विरोध–विकासी द्वंद्ववाद हेगेलचा असो की मार्क्सचा असो. बुद्धी आणि इच्छाशक्ती यांना त्यात प्रधान स्थान असते आणि असे जीवन तर रास्कोलनिकोफला 'प्लेगच्या महाभयंकर साथी'-प्रमाणे वाटते. या विचित्र प्लेगच्या साथीचे आणि त्यातून उद्भवणाऱ्या युद्धांचे वर्णन आपणाला रास्कोलनिकोफच्या दारुण स्वप्नात भेटते. हे स्वप्न पुढे काहीच वर्षांत तंतोतंत खरे ठरले, हा महत्त्वाचा भागही आपण विसरू शकत नाही.

दस्तएवस्कीचे विचारविश्व तसे फार मोठे नाही. ज्या पुष्किनला तो आदर्श मानतो, त्याच्याप्रमाणे ते फार व्यापक तर मुळीच नाही. पण कमालीची उत्कटता आणि प्रखरता त्यात ठायीठायी आहे. त्यात विचार जिवंत होऊन उठतात आणि थयथयाट करतात. तांडव करतात. पण या तत्त्वतांडवाची लय आशावादी आहे की निराशावादी? दस्तएवस्की अखेरीस 'दु:खयातनांचाच प्रेषित' नाही काय? त्याचे विचारविश्व गडद रंगांचेच नाही काय?

जवळून पाहिले तर दस्तएवस्कीचे विचारविश्व आणि तत्त्वमंथन आशावादीच आहे. त्याची पात्रे खूप खूप सोसतात. बिचारी नेली बालपणीच हाल हाल सोसून मृत्युमुखी पडते. बलात्कार झालेली ओल्या भ्रमिष्ट होते आणि आत्महत्या करते. लहा-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नगा इल्युशा वडिलांना न्याय मिळवून देण्याची स्वप्ने बाळगतो पण आजारात मरून जातो त्याला महाग औषध मिळणार कोठून ? लॅंडलेडी कॅथरीन तिच्या दुर्दैवी जीवनातून बाहेर पडू शकत नाही. ती खेड्यात निघून जाते. दिमित्री सैबेरियात जातो आणि तुरुंगातून सुटल्यावर त्याचे नक्की भलेच होते याची खात्री काही नाही. स्तावरोजिन गळफास लावून आत्महत्या करतो. लेब्यातकीन भावंडे ठार मारली जातात. नास्तासियाचा निर्घृण खून पडतोच आणि रोगोझिन सैबेरियात तुरुंगवास भोगतो. एक ना दोन, दस्तएवस्कीची बहुतेक सारी पात्रे सोस सोस सोसतात आणि मृत्यूच्या आधीन होतात. अपमान, दारिद्र्य, अपयश, संकटे, आजार, मनोविकृती, तुरुंगवास, हेवेदावे यांना तोंड देता देता ती खिळखिळी होतात. पहाटेचे रंग क्वचितच कोणाला दिसतात. आणि तरीही दस्तएवस्की आशावादी आहे असेच म्हणावे लागते. पण हा आशावाद श्रद्धास्वरूपात येतो. प्रत्ययाचे किंवा अनुभवाचे सत्य म्हणून नव्हे. 'माणसामाणसांनी एकमेकांवर निरामय प्रेम केले तर नंदनवन अवतरेल' अशी श्रद्धा बाळगणारा हा आशावाद ठरतो. मनावर त्याचा ठसा उमटत नाही.

आणि तसेच पाहिले तर दस्तएवस्कीचे तत्त्वज्ञानही 'विवेक' सांगणारे तत्त्वज्ञानच आहे. 'माणसामाणसांतील प्रेम' हे शहाणपण म्हणून येते, विवेक म्हणून येते. सारे युद्ध झाल्यावर, संहार झाल्यावर, सारे उद्ध्वस्त झाल्यावर, युद्ध करण्यात अर्थ नाही असे वाटावे तसे ते येते. दस्तएवस्कीची माणसे सोसतात आणि मग शहाणी होतात, विवेकी होतात. "माणसाने स्वतःवर करावे असे प्रेम दुसऱ्यावर केले पाहिजे, ही मुख्य गोष्ट आहे. सारे काही एवढेच. बस्स... दुसऱ्या कशाची म्हणजे कशाचीही आवश्यकता नाही. हे कळले की त्या प्रमाणे वागायचे कसे हेही कळते." हे त्यांना उमगते. ती शहाणी आणि विवेकी होतात. (दी ड्रीम ऑफ ए रिडिक्युलस मॅन)

पण आपल्या लक्षात मात्र त्यांचे अपरंपार सोसणेच राहते. आणि असे असले तरी दस्तएवस्कीने स्वतःचाच पराभव केलेला आहे असे म्हणता येणार नाही.

**निवडक संदर्भ :**

१. काम्यू आल्बेर : दि रेबेल (प्रकरण २) पेन्ग्विन, १९६२.

२. झेंकोवस्की व्ही. व्ही : दस्तएवस्कीज रिलिजस ॲण्ड फिलॉसफीकल व्हयूज. (रेने वेलेक संपादित 'दस्तएवस्की' या लेखसंग्रहात, प्रेंटिस हॉल, १९६३.

१९४७-१९५४ पर्यंत झालेल्या मराठी पुस्तकांत साहित्य अकादमी (नवी दिल्ली) चे प्रथम क्रमांकाचे रु. पाच हजाराचे पारितोषिक प्राप्त झालेले पुस्तक

वैदिक संस्कृतीचा विकास

पृ. ६००] (सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ती) [किंमत ३० रु.

लेखक- तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

प्रकाशक : प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (जि० सातारा)



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# पाध्यांचा मार्क्स आणि पाध्यांचा मानव

संजय पळशीकर

मार्क्सच्या एलिअनेशनच्या सिद्धांताचा अभ्यास करण्याच्या निमित्ताने श्री. प्रभाकर पाध्ये यांनी लिहिलेले 'मानव आणि मार्क्स' हे पुस्तक वाचण्यात आले. या आधी समाज प्रबोधन पत्रिकेने 'सोविएत रशियाची पन्नास वर्षे १९१७-१९६७' हे दोन खंड प्रकाशित केले होते, त्यांतील पहिल्या खंडात श्री. प्रभाकर पाध्ये यांनी 'मार्क्सचा मूल्य विचार' हा लेख लिहिला आहे. अलीकडे पुण्याच्या 'सकाळ' या दैनिकाच्या रविवारच्या अंकात 'असाही एक मार्क्स' या नावाचा लेखही त्यांनी लिहिला आहे. या तीनही ठिकाणी पाध्ये मार्क्सच्या विचारांवर व इतर संबंधित विषयांवर जे समीक्षण करतात त्याची ओळख करून देण्यासाठी हा लेख लिहिला आहे. (यापुढे, पाध्यांनी एखादे विधान कुठे केले आहे ते लगेचच कंसात देईन. जिथे फक्त पान क्रमांक आहे तेथे तो 'मानव आणि मार्क्स' या पुस्तकातील समजावा. तसेच पाध्यांच्या अवतरणात वेळोवेळी वापरलेला जाड ठसा माझा समजावा.)

फार खोलात जाण्यापूर्वी पाध्यांच्या शैलीशी ओळख करून घ्यायला हवी. मार्क्सवादावर लिहिताना भाषेचा काही एक किमान काटेकोरपणा आपल्याला अपेक्षित असतो. पाध्ये मात्र आपल्याशी गप्पा माराव्यात तितक्या अनौपचारिकपणे लिहितात. उदाहरणार्थ : "आज वादातीत असा मार्क्स शिल्लकच नाही. खुद्द त्याच्या हयातीतच तो तसा होता का हा प्रश्नच आहे. **नसावा. नव्हताच...**" (मानव आणि मार्क्स, प्रास्ताविक, २) किंवा "खुद्द मार्क्सलाच आपल्या सिद्धांताची **खात्री नव्हती** ... आणि म्हणून मार्क्सच्या अंतर्मनातच **आपल्या सिद्धांताबद्दल संदेह निर्माण झाला असावा. ...एकच सिद्धांत या तीन शब्दांनी मांडणाराचे अंतर्मन आपल्या सिद्धांताबद्दल साशंक असावे यात काय संशय ?**" (सकाळ) किंवा "–स्वत्वाचे सत्य त्याने सामाजिकतेत ... **विसर्जित करून टाकले. विकसित केले असेही हवे तर म्हणावे.** (६४). आणि आता शेवटचे उदाहरण : "आज मानवाला वैताग आणणारे, त्याचा आत्मा अस्वस्थ करणारे, त्याचे अंतरंग विषण्ण करणारे, त्याच्या जीवनाच्या गाभ्यात असंतोषाचे बीज पेरणारे जे सत्य आहे..." (११०). रुक्ष विषयावर लिहितानाही त्यांच्यातील ललित लेखक नेहमी जागा असतो. दुसरी एक गोष्ट आपल्याला माहीत हवी ती म्हणजे पाध्यांना साम्यवादी देशांचा, विशेषतः रशियाचा फार राग आहे. मार्क्सच्या विचारांची चर्चा करतानाही मध्येच रशियाचा वगैरे उल्लेख येतो आणि मग पाध्ये संतापतात. त्यालाही आपली हरकत असायचे कारण नाही. पण रागाच्या भरात त्यांच्याकडून काही चुका होतात एवढीच त्यातली बारीक अडचण आहे. उदाहरणार्थ, मार्क्सची 'इकॉनॉमिक अँड फिलॉसॉफिक मॅन्युस्क्रिप्ट्स' १९३० च्या सुमारास सापडल्यावर बरीच वर्षे रशियाने मुद्दाम अंधारात ठेवली आणि त्यांचे निकृष्ट इंग्रजी भाषांतर प्रकाशित केले असे त्यांना वाटते. "खुद्द रशियन भाषेत १९५९ पर्यंत प्रसिद्ध झाले नव्हते." (सकाळ) किंवा "त्याचे इंग्रजी भाषांतर रशियात **प्रथम १९५९ साली प्रसिद्ध झाले. ते असमाधानकारकच होते.** ...टी. बी. बॉटोमोरनी १९६१ साली एक चांगले भाषांतर प्रसिद्ध केले." (पत्रिका, १). आता वस्तुस्थिती (आणि तीही साधी सरळ, व्यामिश्र वगैरे नाही) अशी आहे की, पहिली अपूर्ण, रशियन भाषेतील आवृत्ती १९२७ ची आहे. त्यानंतर द इन्स्टिटयूट ऑफ मार्क्सिझम-लेनिनिझम (मॉस्को) ने १९३२ मध्ये जर्मन, रशियन, फ्रेंच भाषांमध्ये पूर्ण आवृत्त्या प्रसिद्ध केल्या. १९५९ मध्ये मॉस्कोच्या प्रोग्रेस प्रकाशनाने इतर तीन प्रकाशनसंस्थांच्या

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साहाय्याने मार्क्स व एंगल्सचे 'कलेक्टेड वर्क्स' इंग्रजीतून प्रसिद्ध केले. त्यात पॅरिस मॅन्युस्क्रिप्ट्सचे भाषांतरही आहे. ते मार्टिन मिलिगनने केले आहे. हे भाषांतर पाध्यांनी असमाधानकारक ठरवले आहे. बॉटोमोरचे भाषांतर चांगले आहे असेही ते म्हणतात. पाध्यांचा जर्मन आणि इंग्लिश भाषांचा विशेष अभ्यास असू शकतो. पण जाता जाता त्यांनी मिलीगन कुठे कमी पडतो, किंवा बॉटोमोरचे भाषांतर सरस कसे आहे हे थोडेसे सांगितले असते, तर बरे झाले असते. कारण ओलमन आणि मेझेरस मिलिगन पसंत करतात.[२] पैकी ओलमन[३] त्याची कारणेही देतात. तेव्हा मिलिगन वाईट आणि बॉटोमोर चांगला ही 'यंदा थंडी फार आहे' इतक्या सहजतेने म्हणण्याची गोष्ट नाही.

आता तिसरी गोष्ट पाध्यांच्या विचारात झालेल्या बदलाची. पॅरिस हस्तलिखितांमध्ये मार्क्स परात्मतेचा उगम कशातून होतो हे एके ठिकाणी सांगतो.[४] 'पत्रिके' साठी लिहिताना तो उतारा उद्धृत करून पाध्ये म्हणतात. "मार्क्सचे हे विश्लेषण लक्षात घेण्यासारखे आहे. तो म्हणतो की,... **स्वत्वभ्रष्ट श्रम हा खाजगी मालकीचा परिणाम नसून तिचे एक कारणच आहे.**" (पत्रिका, ७) पुढे सुमारे तेरा वर्षांनी या विषयावर लिहिताना पाध्यांच्या लक्षात आलं असावं की नाही, तसे नाही; मार्क्स म्हणत आहे, की स्वत्वभ्रष्ट श्रम आणि खाजगी मालकी परस्पर पोषक आहे. हे कसे काय? तर पत्रिकेत लिहिताना मार्क्सच्या उताऱ्यातील अर्ध्या भागावरूनच पाध्यांनी निष्कर्ष काढला. आता पूर्ण उतारा उद्धृत करून पाध्ये म्हणतात की, "थोडक्यात म्हणजे परमात्मतेच्या कारणांबद्दल मार्क्सच्या डोक्यात घोटाळा आहे." (९८)

पाध्ये ज्याला मार्क्सच्या डोक्यातील घोटाळा म्हणत आहेत तो काय प्रकार आहे? आधी काय येते (कोंबडी की अंडे), असल्या प्रश्नांमध्ये मार्क्सला रस नाही. असे प्रश्न विचारणारे लोक घटनांचा कालक्रम तपासून त्यावरून त्यांचा तात्त्विक दर्जा सांगू पाहतात. मार्क्स इथे असे म्हणत आहे की, खाजगी मालमत्ता आणि परात्मता यांच्यांत परस्पर पोषकता आहे. असे असताना 'आधी काय येते' हा प्रश्न त्याला विचारण्यात अर्थ नाही. खाजगी मालमत्ता काय किंवा श्रमांचे परात्मीकरण काय, हे माणसांमधले विशिष्ट संबंध आहेत. त्या सुट्या, अलग घटना नाहीत. त्याहूनही महत्त्वाचे म्हणजे ते मार्क्सने लावलेले अर्थ आहेत. आणि अर्थ घटनांच्या स्वरूपात सापडत नाहीत किंवा घडत नाहीत. ते दिसावे लागतात. या हस्तलिखितांमध्ये मार्क्स एके ठिकाणी म्हणतो : "Do not let us go back to a fictitious primordial condition as the political economist does, when he tries to explain.... The economist assumes in the form of a fact, of an event, what he is supposed to deduce– namely, the necessary relationship between two things– between, for example, division of labour and exchange."[५]

शिवाय मार्क्सने लावलेल्या अर्थानुसार जर परात्मता या संकल्पनेतच खाजगी मालमत्तेची संकल्पना अंतर्भूत असेल आणि खाजगी मालमत्तेच्या संकल्पनेत 'परात्मता' येत असेल तर मार्क्सला वैचारिक गोंधळाबद्दल दोषी ठरवण्यात काय अर्थ आहे ?[६]

तसेच, 'पत्रिके'त लिहिताना श्रम करणे म्हणजेच परात्मता असे पाध्यांना वाटले होते. त्यामागची 'मार्क्सवादी' मीमांसा त्यांनी अशी दिली होती : "मानव हा निसर्गाचेच अपत्य आहे; पण त्याच निसर्गावर अत्याचार करून, उत्पादन करून, माणूस जगू शकतो; **यातून परात्मता येते**". (पत्रिका, ७) 'मानव आणि मार्क्स' या पुस्तकात मात्र या विश्लेषणाचा कुठे उल्लेखही नाही. मी म्हणालो तो वैचारिक बदल हाच. (पूर्वीचे पाध्ये आणि आताचे पाध्ये यांपैकी खरे पाध्ये कोणते असा वाद घालण्याचे कारण नाही. एकाच विचारवंताच्या विकासाच्या त्या दोन अवस्था आहेत.) आपण याच विषयावर पूर्वी कधी लिहिले होते; ते धडधडीत चूक होते; आता आपण पाटी स्वच्छ पुसून नव्याने समीक्षण करीत आहोत हे काहीही न सांगता पाध्ये मार्क्सवरील पुस्तक लिहीत राहतात.

हे पुस्तक वाचत असताना आपण नेमक्या कोणत्या विषयावरील पुस्तक वाचत आहोत असा संभ्रम पडतो. उदाहरणादाखल हे काही भाग पहा :






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"अशाच प्रकारचा दुसरा एक प्रयोग कोहलरनी केला. त्यांनी आता तो घड वर माकडाच्या डोक्यावरील छताला टांगला आणि पिंजऱ्यात दोन स्टूले ठेवली. माकडाने प्रथम नुसत्याच उड्या मारून घडाला हात पोचतो का ते पाहिले. नंतर एका स्टुलावर उभे राहून हात पोचतो का पाहिले. नंतर दुसऱ्या स्टुलावरून. पण फुकट. पुनः वैताग, पुनः संताप, पुनः निराशा, पुनः तो घड विसरून स्वस्थ राहण्याचा फुकट प्रयत्न ! पुनः डोक्यात कल्पना, पुनः उडी, पुनः नजरेत लकाकी ! माकडाने आता स्टुलावर स्टूल ठेवले व त्यावर चढून घड पटकावला !" (६३). दुसऱ्या एके ठिकाणी ते म्हणतात : "माद्या फळाला आल्या म्हणजेच नराला जवळ करतात. काही माकडांत नर एकाच मादीला घेऊन राहात असला तर तो अगदी अल्पकाळ. इतर प्राण्यांत नर एकाच वेळी अनेक माद्यांशी संबंध ठेवू शकतो– पण माद्या फळाला आल्या असतील तर. या हंगामातच मादी नराच्या प्रियाराधनाला साद देते. ती वेळ गेली की नर-मादीचे संबंध अलैंगिक असतात. तसे मानवाचे नाही. स्त्री पुरुषाला वर्षाचे बारा महिने तेरा काळ जवळ करू शकते. अगदी गरोदरपणाच्या आणि बाळंतपणाच्या काळातसुद्धा ......" (६९). आता, माहिती म्हणून हे सर्व इंट्रेस्टिंग आहे, पण मार्क्सच्या विचारांवरचे भाष्य म्हणून जर हे पाध्ये सांगत असतील तर त्याचबरोबर वात्सायन व रजनीश यांच्या सिद्धांतांचीही चर्चा करायला हरकत नाही.

संदर्भ व सूची सोडून अवघ्या दोनशे पानांत आटोपणाऱ्या या पुस्तकामध्ये कोण कोण हजेरी लावून जातात ते बघण्यासारखे आहे. म. म. पोतदार व त्यांचे ब्रम्हचर्य, ब्रोनोव्हस्की, थॉर्प, वोलफगांग कोहलर, मॅकिटायर, लूकाश्च, लेनिन, चॉम्स्की, पियाजे, चार्ली चॅप्लिन, काम्यू, सार्त्र, मे. पुं. रेगे, क्लिफर्ड गीर्ट्झ इत्यादी. आता हे सगळे इथे काय करीत आहेत ? तर त्यांचा मार्क्सला झोडपून काढायला उपयोग होतो असे वाटल्यामुळेच पाध्यांनी त्यांना एकत्र आणले आहे. पाध्यांच्या मार्क्सवरील लिखाणावर माझे तीन आक्षेप आहेत. एक : पाध्ये वेगवेगळ्या विचारवंतांचा व विचार-पद्धतींचा आधार घेतात. तत्त्वतः यामध्ये चूक काहीच नाही. पण एवढा सगळा बाजारहाट केल्यावर तुमची स्वतःची काही एक भूमिका तयार व्हायला हवी. समीक्षण करणे म्हणजे गौरीपुढची आरास मांडणे नव्हे. एवढे सगळे विचारवंत गोळा केल्यावर त्यांना एका सूत्रात गोवता आले पाहिजे. थोडक्यात म्हणजे, एका भूमिकेवरील टीका दुसऱ्या भूमिके-वरूनच होऊ शकते. तसे पाध्यांच्या टीकेत होत नाही. माझा दुसरा आक्षेप असा की, ते आपले म्हणणे पुरावा न देता आग्रहाने मांडतात आणि तिसरा आक्षेप : मार्क्सचे लिखाण कसे वाचावे, त्याचा अर्थ कसा लावावा हे त्यांना समजत नाही. खुद्द मार्क्सवाद्यांमध्ये मार्क्सचा एखाद्या ठिकाणी काय अर्थ लावावा यावरून वाद होत आहेत. पण पाध्ये जो अर्थ लावत असतात तो इतका अद्भुत असतो की, तो त्यांनी मार्क्सचे सर्व लिखाण बाजूला सारून त्याच्या दर दोन ओळींमधील रिकाम्या जागेतच वाचलेला असतो. उरलेल्या लेखात हे तिन्ही आक्षेप क्रमाक्रमाने घेऊन तुम्हाला पटवून देण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

मधून मधून पाध्ये मार्क्सचे मनोविश्लेषण करू पाहतात. उदा.– "–एक सामर्थ्यशाली विचार-प्रणाली निर्माण करण्याचा प्रयत्न तो ( म्हणजे मार्क्स ) एक प्रकारच्या अंतःप्रेरणेने आणि कदा-चित नेणिवेतील काही अशांत प्रेरणेने करीत होता." ( मानव आणि मार्क्स, प्रास्ताविक, २ ). मार्क्सने सांगितलेल्या बौद्धिक श्रम आणि शारी-रिक श्रम यांतील द्वंद्वाच्या संदर्भात ते म्हणतात– "मार्क्स स्वतः केवळ बौद्धिक श्रम करणाराच होता, पण बुद्धिमंतांच्या ठिकाणी एक न्यूनगंड असतो तो त्याला बाधला की काय न कळे. खरा श्रमविभाग म्हणजे शारीरिक श्रम आणि बौद्धिक श्रम यांमधली विभागणी असा निर्णय तो उराशी घट्ट धरून बसला." ( १६१ ). रविवार सकाळ-मधील लेखात पाध्ये म्हणतात की, आपल्या भाकिताप्रमाणे क्रांती होत नाही असे पाहून मार्क्सला वैफल्याने ग्रासले आणि त्याचे मन साशंक झाल्याने एकाच ठिकाणी तीन वेगवेगळ्या अर्थांचे शब्द वापरणे वगैरेसारखे प्रकार त्याच्या-कडून होऊ लागले. मधून मधून अशी वाक्ये


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

फेकण्यापलीकडे पाध्ये पद्धतशीरपणे मार्क्सचे मनोविश्लेषण करण्याचा कुठेही प्रयत्न करीत नाहीत. त्याच्या परात्मतेच्या सिद्धांताची चर्चा करताना, व्यक्ती बालपणातून प्रौढावस्थेकडे जाताना तिला कुठल्या सामाजीकरणाच्या (सोशलायझेशनच्या) अनुभवातून जावे लागते ते सांगतात आणि एकदम औद्योगीकरणाच्या यांत्रिकतेकडे, कृत्रिमतेकडे येतात. (९०), तिथून सामाजिक पाश व व्यक्तिवैशिष्ट्य यांतील झगड्याकडे जातात (९१) आणि पुढच्याच परिच्छेदात 'जीवनात आपली स्वप्ने विस्कटतात, एकलेपण वाटते, जीवन अर्थशून्य वाटते, त्यातून जीवनाबद्दलची तत्त्वज्ञाने निघतात' असे बरेच काही खास पत्रकाराच्या शैलीत लिहून जातात.

सामाजिक मानसशास्त्राला काही पाध्यांनी बांधून घेतलेले नाही. तिथून ते शरीर-मानसशास्त्राकडेही जातात. साम्यवादी समाज अस्तित्वात येणे शक्य नाही असे त्यांना वाटते. त्याचे कारण असे की, 'मानवाचा मेंदू एकात्म रीतीने उत्क्रांत झालेला नाही. काही पेचप्रसंग उद्भवला की, बुद्धी आणि भावना यांत वितुष्ट येते आणि मेंदू नीट काम करू शकत नाही. पेचप्रसंगरहित समाज असू शकत नाही, म्हणून फुटीर मेंदूच्या मानवाला साम्यवादी समाज कधीकाळी प्रस्थापित करता येईल का याची शंका वाटते.' (५४-५५, ५७, १४३). सुमारे डझनभर ओळींमध्ये हा मुद्दा मांडल्यावर पुन्हा पाध्यांना त्याची चुकूनही आठवण होत नाही. मानवाचा त्रिभंग मेंदू व्यक्तिस्वातंत्र्य आणि लोकशाही यांवर आधारलेला खुला समाज निर्माण करण्याच्या आड येणार नाही का, असा प्रश्न त्यांना पडत नाही. किंवा मानवी स्वभावाबद्दल आपण सामाजिक-मानसशास्त्रीय विधाने करतो त्याचा आणि या शरीर-मानसशास्त्रीय विधानांचा काय संबंध आहे ते सांगण्याची आपल्यावर जबाबदारी आहे असेही त्यांना वाटत नाही.

या सगळ्याच्या जोडीला पाध्यांची अनुभववादी भूमिकाही मधून मधून येते. मार्क्सची भाकिते चुकली असे पाध्ये म्हणतात आणि 'अभ्युपगम कसोटीला उतरला' तरच तो स्वीकारायचा असतो असे म्हणतात (१५१-३). तेव्हा त्यांना अनुभववादच अभिप्रेत असतो. परंतु याच अनुभववादापासून ते स्वतः मात्र मुक्त आहेत. जीवनावर भाष्य करताना (३६, ९१); 'आपण उत्पन्न केलेल्या उत्पादनावर आपली मालकी असावी असे फारसे कुणाला वाटत नसावे' असे म्हणताना (१०३); माणसाच्या जीवनात अहम्‌चे किती महत्त्व आहे ते सांगताना (७३, १७२) कुठेही अनुभववादी परंपरेत ज्या प्रकारचा पुरावा देणे अपेक्षित असते तसा पुरावा देण्याच्या फंदात ते पडत नाहीत. ही अमुक एक गोष्ट तुम्हाला कुठे आणि कशी समजली असा साधा प्रश्न विचारला तर त्याला पाध्यांजवळ उत्तर नाही.

मार्क्सच्या परात्मतेच्या संकल्पनेच्या चर्चेत काम्यू, सार्त्र आणायचे (आणि तेही नुसतेच घुसखोरासारखे येतात; मार्क्सवर प्रकाश पडण्यासाठी त्यांचा काहीच उपयोग होत नाही); ऐतिहासिक भौतिकवाद स्वतःला मान्य नसतानाही लूकाश्चचा संदर्भ द्यायचा ('प्रत्येक सिद्धान्ताचे विशेष, तो ज्या आर्थिक-सामाजिक व्यवस्थेत जन्मतो त्याने उत्पन्न होतात हा सिद्धान्त मार्क्सवादाला लागू करायला हवा') (१९); सोयीचे असेल तेव्हा 'भाकिते चुकली त्याचे काय' म्हणून विचारायचे आणि सोयीचे असेल तेव्हा ललित लेखनात्मक भाष्य करीत जायचे; उच्च प्रतीच्या धार्मिक बुद्धीचे मार्क्सवाद समाधान करू शकतो असे रेग्यांच्या आधाराने म्हणायचे; आणि मार्क्सवाद जर धर्म असेल तर धर्म-विचारांचा ज्ञानशास्त्राच्या दृष्टीने काय दर्जा असू शकतो; 'विज्ञान' म्हणून मांडलेला विचार जर धर्म म्हणून उचलला जात असेल तर हा communication चाच कसा प्रश्न आहे यांपैकी कुठलाही मुद्दा उपस्थित न करता पुढे जायचे (५८-६०, १२८). थोडक्यात म्हणजे कुठलीही सुसंगत भूमिका न घेता पाध्ये हाती मिळेल ते उचलून मार्क्सवर फेकत आहेत.

आता दुसरा आक्षेप. निराधार मुद्दे मांडण्याबाबतचा. सकाळ मधील लेखाचा उल्लेख या आधी आलाच आहे. तेथे पाध्ये म्हणतात की, आपल्या भाकिताप्रमाणे इंग्लंड वा यूरोपमध्ये क्रांती होत नाही हे पाहून मार्क्स साशंक झाला. त्याला वैफल्याने ग्रासले. त्यातून आपल्या सिद्धांतांबद्दल त्याच्या मनात शंका निर्माण झाली (सकाळ). आता हा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अंदाज भक्कम पुराव्यावर आधारला पाहिजे. त्याचा पत्रव्यवहार, त्याच्या इतरांनी सांगितलेल्या आठवणी व उपलब्ध चरित्रे यांच्या मदतीने हे म्हणता आले पाहिजे. पण हे काही न करता पाध्ये दोनच पुरावे देतात. एक म्हणजे मार्क्सचे 'थँक गॉड ! आय अॅम नॉट अ मार्क्सिस्ट' हे उद्‌गार. पण याच उद्‌गारांचा पाध्यांनी दुसरीकडे (सकाळ, मानव आणि मार्क्स–३३) असा अर्थ लावला आहे की, आपल्या विचारांची इतरांकडून होणारी ओढाताण पाहून मार्क्स वैतागला व वैतागाच्या भरात हे उद्‌गार त्याने काढले. म्हणजे एक पुरावा बाद झाला. दुसरा असा आहे : १८५९ साली प्रसिद्ध झालेल्या 'द क्रिटीक ऑफ पोलीटिकल इकॉनॉमी' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत ऐतिहासिक भौतिकवादाच्या सिद्धांताची जी मांडणी केली आहे त्यात तीन सलग वाक्यांमध्ये मार्क्स तीन वेगवेगळे शब्द वापरतो. यावरून त्याचे साशंक मन दिसते (सकाळ). आता इथे अशी शंका निर्माण होते की, ह्या एकाच उदाहरणावरून मार्क्सचे साशंक झालेले मन (सकाळ) आणि निष्काळजीपणे विधाने करण्याची त्याची सवय (१५–१८) ह्या दोन्ही गोष्टी कशा सिद्ध होतात ?

पुरावा वगैरे जाऊ द्या, पण आपलेच म्हणणे आपणच खोडून काढण्याची हेगेलच्या विश्वचेतनाची शैलीही पाध्ये वापरतात. "'पॅरिस मॅन्युस्क्रिप्ट्स' लिहिणारा तरुण उत्साही मार्क्स आणि कॅपिटल ग्रंथ लिहिणारा प्रौढ विचारी मार्क्स हे दोन समजायचे की काय ?" याला त्यांचे उत्तर असे आहे– "तेव्हा अपरिपक्व मार्क्स आणि परिपक्व मार्क्स असा भेद चिवडीत बसण्याचे खरोखर कारण नाही." (७९–८०); "मार्क्सचा परात्मतेचा सिद्धांत त्याच्या ऐतिहासिक भौतिकवादाशी फार संलग्न आहे." (७८) आणि 'द जर्मन आयडिआलॉजी'मध्ये मार्क्सने "आपला ऐतिहासिक भौतिकवादच मांडला आहे." (७९).

आता ह्या आधी पाध्ये वेगवेगळ्या ठिकाणी काय म्हणतात ते पहा : '१८४५ पूर्वीच्या लिखाणात' मार्क्सने मानवाच्या स्वसर्जनशीलतेवर स्वप्रतिज्ञतेवर वगैरे भर दिला आहे असे सांगून (४३) पाध्ये म्हणतात : "१८४६ साली मार्क्सच्या डोक्यात त्याचा ऐतिहासिक भौतिकवादाचा सिद्धांत आकारास आला व त्याची दृष्टी मानवाच्या अंतरंगाकडून, त्याच्या 'स्व'कडून बाहेरच्या उत्पादनसाधनांकडे अधिक वळली... आता मानवाच्या जाणिवा, त्याचे विचार हे आर्थिक पायावर उभारलेले सांगाडे ठरले." (४६) किंवा : ऐतिहासिक भौतिकवाद "या सिद्धांताचा शोध लागल्यानंतर मार्क्सचे लक्ष मानवापेक्षा त्याची उत्पादनसाधने आणि उत्पादनसंबंध यांकडे अधिक वळले..." (४०) "ऐतिहासिक भौतिकवादाच्या उत्साहात मार्क्सने स्वत्वाला जवळ जवळ तिलांजली दिली... मानवाची ही मानवता, तो जे निसर्गावर संस्कार करतो आणि त्यासाठी इतरांशी जे सहकार्य करतो, आणि यातून मानव आणि निसर्ग यांची जी एकता प्रस्थापित होते तिने सफल होते अशी त्याची धारणा होती. पुढे १८४५–४६ नंतर त्याला ऐतिहासिक भौतिकवादाचा सिद्धांत सापडला– या सिद्धांताने त्याची वैचारिकता विशेष व्यापली आणि स्वत्वाचे सत्य त्याने सामाजिकतेत– उत्पादनसंबंधांनी संस्कारलेल्या सामाजिकतेत– विसर्जित करून टाकले. विकसित केले असेही हवे तर म्हणावे." (६४)

पाध्ये स्वतःच चाळीस पानांच्या अवधीत स्वतःचे म्हणणे खोडत आहेत. मार्क्सची मानवी इतिहासाकडे पाहण्याची जी दृष्टी होती तिला पाध्ये ऐतिहासिक भौतिकवाद म्हणतात आणि तिचा 'शोध' त्याला लागला असे म्हणतात हे लक्षात घेण्यासारखे आहे.

पाध्ये अशी परस्पर विरोधी विधाने का करतात हे समजून घेण्यासाठी 'स्व' आणि 'अहम्'चा त्यांनी केलेला घोटाळा बघायला हवा. मार्क्सच्या self-determined, self-realizing वगैरे संकल्पना मराठीत आणताना पाध्ये 'स्व' हा शब्द वापरतात (४३, ४४, ६३). पुढे 'स्व'च्या बरोबर 'अहम्' ही संकल्पना वापरायला लागतात (७३). आणि मार्क्सने व्यक्तीच्या अहम् कडे पुरेसे लक्ष दिलेले नाही, असा आक्षेप घेतात (७४, ९१). मार्क्सने स्वत्वाचे सत्य उत्पादनसंबंधात विसर्जित केल्याबद्दल पाध्ये त्याला दोषी धरीत आहेत हा भाग या आधी आला आहेच (६४). या सर्व विश्लेषणातील काही भाग इथे मांडले तर पाध्ये सत्ता-



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शास्त्रीय essence किंवा स्वत्व याची व मानस-शास्त्रीय identity, ego अथवा अहम्‌ची कशी गल्लत करीत आहेत ते स्पष्ट होते : " मन आले तेथे संज्ञा आली आणि संज्ञा आली की स्वसंज्ञता आलीच– म्हणजे 'स्व'ची जाणीव आलीच, मार्क्स स्व-नियतता, स्व-सर्जनशीलता, स्व-सिद्धी, स्व-संज्ञा, स्व-प्रतिज्ञा अशी भाषा वापरतो तेव्हा तो 'स्व'चे माहात्म्य मान्य करतो हे उघडच आहे." (४५). १८४५–४६ च्या लिखाणात मार्क्सने स्वसर्जनशील-तेवर, स्वप्रतिज्ञतेवर भर दिला आहे असे पाध्ये म्हणतात (४३). आणि नंतर मात्र त्याने 'स्व'ला तिलांजली दिली (६४). ही त्याची चूकच झाली, कारण "मानवाला सारखे स्वतःचे भान असते. तो सारखा स्वत्वाला जपत असतो... हे सत्य हेगेलने जाणले, पण ते विश्वचैतन्यात विसर्जित करून टाकले.... ऐतिहासिक भौतिकवादाच्या उत्साहात मार्क्सने स्वत्वाला जवळ जवळ तिलांजली दिली ..." (६४).

पाध्यांचे हे 'स्वत्व' कसे निर्माण होते ? पहिली गोष्ट म्हणजे हे मानवी स्वत्व, माणूसपण नाही. तर प्रत्येक व्यक्तीचे जे वेगळेपण असते, जे मीपण असते ते हे आहे. "प्रथम म्हणजे 'स्व' अशी काही चीज असते. व्यक्तीची जनुके आणि त्याचा अनुभव यांचा गुणाकार होऊन त्यातून तिचा स्व अगर व्यक्तित्व तयार होते. हा 'स्व' वर्तनातून सिद्ध होतो. 'स्व'ची जाणीव म्हणजे स्वसंज्ञा... स्वतःविषयीच्या या जाणिवेतूनच व्यक्तीचा अहम् अगर ego निर्माण होत असतो. परात्मतेची बाधा होते ती या अहम्‌ला होते..." (८८–८९). यापुढील परिच्छेदांमध्ये (८९–९१) पाध्ये त्यांचा परात्मतेचा अर्थ सांगतात. व्यक्तीचे वेगळेपण आणि समाजाची बंधने यांतून व्यक्तीला ज्या मानसिक तणावांमधून जावे लागते त्याला ते परात्मता म्हणतात.

हे तर उघडच आहे की, मार्क्सची स्व ची कल्पना आणि म्हणून त्याची परात्मतेची कल्पना पाध्ये सांगताहेत त्यापेक्षा पूर्णपणे वेगळी आहे. तिथे आपण विचार करतो तो व्यक्ती व समाज यांच्यांतील द्वंद्वाचा नाही, व्यक्तींच्या वैशिष्ट्याचा नाही, तर माणूसपणाचा. हे जे मानवी सत्त्व आहे ती काही तयार, प्रत्येक माणसात ईश्वरी प्रसादाचा अंश या रूपात सापडणारी आणि दिव्य दृष्टीच्या तत्त्ववेत्त्यालाच दिसणारी गूढ गोष्ट नाही. जिवंत राहण्यासाठी माणसाला उत्पादन केले पाहिजे, म्हणजेच कृतीच्या माध्यमातून निसर्गाशी संवाद प्रस्थापित केला पाहिजे. पण ह्या संवादातच माणसांचे एकमेकांशी संबंध निर्माण होऊन समाजाची निर्मिती होणेही अपरिहार्य असते. आणि माणसाची कृती (श्रम) ही विकासमान गोष्ट असल्याने मानव–निसर्ग संबंध आणि माणसामाणसांतले संबंध दोन्ही बदलत जातात. हा बदल म्हणजेच इतिहास. या इतिहासाच्या ओघात माणूस जो घडत जातो, ते घडणे म्हणजेच माणसाचे सत्त्व. या सत्त्वाच्या विकासाला मानवी गरजा व क्षमतांना भांडवलशाही समाजात अडथळा येतो, चहू बाजूंनी वेढा पडतो, ती परात्मता. पाध्ये म्हणतात त्याप्रमाणे परात्मतेची बाधा अहम्‌ला होत नाही तर ती सत्त्वाला ( किंवा 'स्व'त्वाला) होते.

मी आधी एके ठिकाणी म्हटलेच की, मार्क्सचे लिखाण कसे वाचावे हे पाध्यांना समजत नाही. तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र– काहीही वाचत असताना पाध्ये त्यात मानसशास्त्रच वाचत असतात. आक्षेप याबद्दल नाही की, पाध्यांना मार्क्सचे विचार पटत नाहीत. किंवा पाध्ये मानस-शास्त्रीय दृष्टीने बघतात त्यातही गैर नाही. पण मार्क्सच्या संकल्पना घ्यायच्या, त्यांत आपले अर्थ भरायचे, ते अर्थ घेऊन मार्क्सकडे जायचे, त्याच्याकडून विश्लेषण घ्यायचे आणि ते कसे चूक आहे ते दाखवायचे. ( स्वतंत्र बुद्धीने विचार करणारे विचारवंत इतका स्वतंत्र विचार करायला लागले तर आम्ही परभूतांनी काय करावे ? आम्हाला मार्क्समध्ये मार्क्सचेच अर्थ दिसावेत असा आमचा प्रयत्न असतो. आणि त्या प्रयत्नात पाध्यांचा आम्हाला उपयोग नाही. )

मुळातच हा असा घोटाळा झालेला असल्याने पाध्यांनी केलेले मार्क्सच्या परात्मतेच्या सिद्धांताचे मूल्यमापन पूर्णपणे अनाठायी, निरर्थक ठरते. उदा-हरणार्थ, सेल्फ एलिअनेशन. भांडवलशाही समाजात माणूस नाईलाजाने, निव्वळ पोट भरण्यासाठी काम करतो. उत्स्फूर्त, जाणीवपूर्ण कृती करणे ही माणसाची जी मूल प्रकृती आहे त्यापासून तो दूर जातो, ह्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याचा अर्थ आहे. परंतु 'स्व' म्हणजे 'अहम्' हे धरून बसल्यामुळे पाध्यांना हा काय प्रकार आहे ते लक्षातच येत नाही. ते म्हणतात की, 'स्वतःला मुकणे (सेल्फ एलिअनेशन) म्हणजे आत्मजाणिवेला मुकणे. पण कितीही वाईट परिस्थिती आली तरी माणूस आत्मजाणीव कशी गमावून बसेल ? उलट परात्मता हा आत्मजाणिवेचाच एक प्रकार आहे'! (१०७).

असाच प्रकार मार्क्सच्या फॉयरबाखवरील दुसऱ्या टिपणाबाबत झाला आहे. ते टिपण असे आहे : "The question whether objective truth can be attributed to human thinking is not a question of theory but is a practical question. Man must prove the truth, i. e. the reality and power, the this-sidedness of his thinking in *practice*. The dispute over the reality or non-reality of thinking that is isolated from practice is a purely scholastic question."[९] यावर पाध्ये म्हणतात : "...मार्क्स म्हणतो की, एखाद्या विधानाची सत्यासत्यता त्याचे तार्किक निष्कर्ष वस्तुस्थितीशी कितपत जुळतात ते पाहून ठरवावी. ...पण मार्क्स यात नवीन काय सांगत आहे हे माझ्या नीटसे ध्यानात आले नाही. बेकनने सांगितलेल्या विगमनात्मक वैज्ञानिक पद्धतीत हेच सांगितलेले नसते काय ? आपण वस्तुस्थितीचे विश्लेषण करतो, वर्गीकरण करतो, त्याच्या आधारावर अभ्युपगम बसवितो. त्याचे निगमनपद्धतीने तार्किक निष्कर्ष काढतो आणि या तार्किक निष्कर्षांशी वस्तुस्थिती–व्यापक वस्तुस्थिती–जुळते की नाही हे पाहून अभ्युपगमाला सिद्धान्ताचे रूप देतो. **यापेक्षा मार्क्स निराळे काय सांगतो आहे?"** (१७०)

मार्क्सशी आणि तत्त्वज्ञानाशी नुसती तोंडओळख असलेल्यांच्याही लक्षात यातील घोटाळा येईल. फॉयरबाखवरील आपल्या टिपणात मार्क्स सांगतो आहे की, मानवी विचारांची सत्यासत्यता ठरविणे हा सैद्धांतिक चर्चेचा प्रश्न नाही. मानव आणि वास्तव यांच्यांतील संबंधामधून विचारांचा, दृष्टिकोणांचा जन्म होतो. हे वास्तवाचे अर्थ घेऊन माणसे त्याच वास्तवाकडे परत जातात, व त्यावर संस्कार करतात. अशा कृतीमधूनच वास्तव आकार घेते. त्यामुळे कृतीला बगल देऊन निव्वळ सैद्धान्तिक पातळीवर सत्य काय हे ठरवणे चूक आहे. त्या 'सत्या'चा उगम मानव-वास्तव यांच्या आंतरक्रियेत झालेला असल्यामुळे सत्यासत्यतेविषयीचा अंतिम निर्णय ती आंतरक्रियाच देईल.[१०] बेकनची विगमनपद्धती यापासून शतयोजने दूर आहे. त्यामध्ये वास्तव ही हेगेलियन–मार्क्सियन कल्पना नाही. त्यामुळे त्या पद्धतीत मानव आणि वास्तव अलग राहतात. माणूस अंदाज बांधतो व ते वास्तवाशी ताडून पाहतो. वास्तव बदलण्याचा संबंध येत नाही. बदलतात ते सिद्धांत. इतका फरक असतानाही बेकनपेक्षा मार्क्सने वेगळे काय सांगितले असे पाध्ये विचारतात."

मार्क्सच्या परात्मतेच्या संकल्पनेबाबत पाध्यांनी केलेला घोटाळा या आधी सांगितलाच; पण शिवाय, मनुष्यस्वभावाची चर्चा करताना पाध्ये मांजर, कावळे, माकड यांच्यावरील प्रयोगांची चर्चा करून काय मिळवतात कोणास ठाऊक ! अमीबापासून प्रवास सुरू केला आणि दरेक पायरीवर वैशिष्ट्यांमध्ये संख्यात्मक वाढ करीत गेले की, आपण अलगद माणसापर्यंत येऊन पोचतो का? मानव आणि मानवेतर यांत काही qualitative-jump आहे की नाही ? अंतर्दृष्टी (इन साइट), भाषा, हत्यारे बनविणे, कलाकृती निर्माण करणे या वैशिष्ट्यांच्या मानवेतर प्राणी व माणूस यांच्यांत झालेल्या विकासाचा आलेख काढणेही पाध्यांना जमलेले नाही. प्रत्येक बाबतीत ते कबुली देतात की, मानवात ही वैशिष्ट्ये ज्या विकसित अवस्थेला पोचली आहेत त्या मानाने इतरत्र अगदीच प्राथमिक स्वरूपात सापडतात. (४६–५५). पाध्ये म्हणतात की, प्राणिशास्त्रीय दृष्ट्या मानव–मानवेतर भेद संख्यात्मक ( quantitative ) आहे, परंतु सांस्कृतिक भेद गुणात्मक (qualitative) आहे ( ६६ ). पण असे जर असेल तर त्याचे दोन अर्थ होतात. एक तर माणसाचा स्वभाव, त्याची संस्कृती समजून घ्यायची असेल तर इतर प्राण्यांच्या अभ्यासाचा उपयोग नाही. आणि दुसरे म्हणजे, प्राणिशास्त्रीय दृष्टीने माणसाचे इतर प्राण्यांशी 'इतके' दृढ नाते असतानाही मानवी समाज,

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

संस्कृती इतकी वेगळी असेल तर त्याचा अर्थ असा आहे की, माणसाचा स्वभाव व त्याची सांस्कृतिक वैशिष्ट्ये त्याच्या शारीरिक वैशिष्ट्यांचा परिणाम नाहीत. म्हणजेच मानवी मेंदूच्या रचनेवरून विशिष्ट प्रकारचा समाज आणणे माणसाला शक्य होईल की नाही याबाबत पाध्ये जे मत व्यक्त करीत आहेत ( ५४–५५, ५७,१४३ ), त्याला आधार नाही.

' मानव आणि मार्क्स 'च्या प्रास्ताविकात पाध्ये मार्क्सला त्यांच्या बौद्धिक जीवनाचा मॉनिटर म्हणतात. " या मॉनिटरशी आपला बौद्धिक हिशेब चुकता करून टाकावा असे अनेक दिवस वाटत होते " ( मानव आणि मार्क्स, प्रास्ताविक, १ ). या वाक्यावरून पुस्तकाविषयी काही अपेक्षा निर्माण होतात. असे वाटते की, आता आपल्याला मार्क्सवादी विचाराशी अत्यंत खोलात जाऊन घातलेला वाद वाचायला मिळेल. प्रत्यक्षात मात्र मार्क्सवाद आणि ' साम्यवादी ' राष्ट्रे यांचे विरूप चित्र रंगविण्यातच त्यांना रस आहे असे दिसून येते. आज पाध्यांचा ' भांडवलशाहीपुढे आता आर्थिक अरिष्टाचा धोका उरलेला नाही ' हा दावा वाचताना गंमत वाटते. वि. म. दांडेकरांचा भाबडा वर्गविग्रह ( संघटित वि. असंघटित ) ज्या सहजतेने पाध्ये उचलतात त्यावरून पाध्यांनी हे सर्व प्रकरण कितपत गंभीरपणे तपासले आहे त्याची कल्पना येते. कोलॅकोव्हस्की मार्क्सवादाविरुद्ध आहे. पाध्ये मनापासून त्याचा संदर्भ देतात. पण ह्याच कोलॅकोव्हस्की उदारमतवादावर आधारित खुल्या समाजाच्या अडचणींविषयी, मर्यादांविषयीही जागरूक आहे.[११] पाध्यांच्या " स्व " ला मात्र मार्क्स नावाच्या एकाच परात्मतेने ग्रासले आहे. त्यामुळे मार्क्सवाद टाकून देऊन उदारमतवादावर आधारित ( ! ) जनकल्याणकारी राज्याकडे जाण्याचा निर्णय त्यांना फार सहजपणे घेता येतो. पाध्ये पूर्वी कट्टर मार्क्सवादी होते असे ऐकिवात आहे. ते जर खरे असेल तर पाध्ये वेगळ्या अर्थाने मार्क्सबरोबरचा हिशेब चुकवत आहेत असे वाटते.

**संदर्भ व टीपा :**

१. **मानव आणि मार्क्स**, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, १९८०; **सोविएत रशियाची पन्नास वर्षे** १९१७–१९६७, खंड पहिला, समाज प्रबोधन संस्था, पुणे, १९६७; दैनिक **सकाळ**, पुणे, दि. ९ जानेवारी १९८३. (मानव आणि मार्क्सचा बहुतेक भाग ' नवभारता'त प्रसिद्ध झाला होता.)

२. Bertell Ollman, *Alienation : Marx's Conception of Man in Capitalist Society*, Cambridge, London, 1971; István Mèszáros, *Marx's Theory of Alienation*, Merlin Press, London, 1975. पॅरिस मॅन्युस्क्रिप्ट्सच्या प्रकाशनविषयक माहिती मेझेरसमध्ये पृ. ११ वर मिळेल.

३. बर्टेल ओलमन, पूर्वोक्त; Note on Translations, p. Vii.

४. " But analysis of this concept shows that though private property appears to be the reason, the cause of alienated labour, it is rather its consequence..." या भागावरून पाध्यांनी निष्कर्ष काढला की, मार्क्सच्या मते स्वत्वभ्रष्ट श्रमातून खाजगी मालकीचा जन्म होतो. पण त्याच्याच पुढे मार्क्स म्हणतो, "...Later this relationship becomes reciprocal...on the one hand it is the *product* of alienated labour, and...on the other it is the *means* by which labour alienates itself, the *realization of this alienation*." Marx, *Economic and Philosophic Manuscripts of 1844*, Progress, Mascow, 1977, p. 77.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

५. मार्क्स, इकॉनॉमिक अँड फिलॉसॉफिकल मॅन्युस्क्रिप्ट्स, पूर्वोक्त, पृ. ६७.

६. जेव्हा जेव्हा मार्क्स अशा दोन संकल्पना समानार्थी वापरतो किंवा दोन्ही संकल्पनांचा एकमेकींमध्ये अंतर्भाव करतो, तेव्हा तेव्हा तो त्याचा वैचारिक गोंधळ नसून सामाजिक वास्तवाकडे पाहण्याची त्याची ती दृष्टीच आहे असे मानायला जागा आहे. पहा : बर्टेल ओलमन, पूर्वोक्त; विशेषत: पृ. १२–४२. ओलमनचे म्हणणे असे आहे की, मार्क्स हा Theory of Internal Relations मानणाऱ्या विचारवंतांच्या परंपरेतील होता. अर्थात डायलेक्टिक्स् मध्येही Internal Relations ची कल्पना येतेच. मार्क्सच्या 'वैचारिक गोंधळा'कडे या सगळ्या संदर्भात पाहायला हवे.

७. पाध्यांनी 'मानव आणि मार्क्स'च्या शेवटी संदर्भग्रंथांच्या यादीत डेव्हिड मॅकलेलानच्या 'द थॉट् ऑव्ह् कार्ल मार्क्स'चाही संदर्भ दिला आहे. त्या पुस्तकात मॅकलेलान म्हणतो, " 'Historical Materialism' was a term never used by Marx, who would have felt even less happy with the later expression 'dialectical materilism.' He preferred to talk of 'the materialist conception of history' or 'the material conditions of production', i. e. it was viewed more as a method or approach then as a fully developed system of ideas." David McLellan, The Thought of Karl Marx, McMillan, Londen, 1980, p. 135.

८. प्रभाकर पाध्ये ज्या प्रकारचे मुद्दे परात्मतेच्या संदर्भात मांडत आहेत तसेच मुद्दे वॉल्टर काऊफमान मांडतात. रिचर्ड शॅश्ट्च्या पुस्तकाला त्यांची प्रस्तावना आहे. पाध्ये असे मानतात की, परात्मता आदिम आहे. (८८, ११०). काऊफमानसुद्धा म्हणतात "Would it have haunted men so much if alienation from the universe, society and oneself had been foreign to most men until recently?" [p.xxxvi]. पाध्ये म्हणतात की, परात्मतेची अनेक रूपे आहेत आणि मार्क्स त्यांची दखलच घेत नाही (११०). काऊफमान म्हणतात, "But the forms of alienation are manifold, and no single prescription will fit all..." [p.lvi]. परात्मतेने ग्रासलेल्या व्यक्तीकडून कलानिर्मिती होण्याची शक्यता आहे असे पाध्ये म्हणतात. ते तुकारामाचे उदाहरण देतात. (१०७). काऊफमान सांगतात की, वेगवेगळ्या तत्त्वज्ञांना परात्मतेने ग्रासले होते; विविध साहित्यिकांनी परात्मतेचा विषय हाताळला आहे; काफ्कासारखे काही स्वतःही एलियनेटेड् होते; थोडक्यात, "On the contrary, the creative person is, perhaps even by definition; a non-conformist... The more profoundly original he is, the more profoundly is he bound to become alienated from his society." [p. xxxix]. पाध्यांच्या मते पाश्चात्त्य भांडवलशाही देशांमध्ये कामगारांचे पगार वाढले आहेत आणि कामाचे तास नियंत्रित करण्यात आले आहेत; त्यामुळे त्यांना परात्मता बाधण्याचे कारण नाही. (१०५) काऊफमानही म्हणतात : "What makes it possible for laborers as well as doctors and students to go hunting and fishing is a high standard of living coupled with a short work week..." [p. xli]

पहा : Walter Kaufmann, '*The Inevitability of Alienation*' in : Richard Schacht, *Alienation*, George Allen and Unwin, London, 1971.

दखल घ्यावी अशी ही मते नाहीत. कामगारांची गरिबी हे त्यांच्या परात्मतेचे मूळ आहे असे मार्क्स म्हणत नाही किंवा परात्मतेची जी वेगवेगळी रूपे पाध्ये व काऊफमान यांना अभिप्रेत आहेत तशी ती मार्क्सला नाहीत. हे दोघेही जण मार्क्सवर टीका करताना आपल्या मनातील अर्थ आणि मार्क्सचे अर्थ यांची गल्लत होऊ नये अशी किमान दक्षतासुद्धा घेत नाहीत.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

९. Marx, *Theses on Feuerbach*, in : David McLellan, *Karl Marx : Selected Writings*, Oxford, 1977, p. 156.

१०. या संदर्भात अधिक चर्चेसाठी पहा : Jorge Larrain, *The concept of Ideology*, B. I. Publications, Delhi, 1981, pp. 37–44 and p. 60; तसेच, Richard Kilminster, *Theory and Practice in Marx and Marxism'*, in : G. H. R. Parkinson, ed., *Marx and Marxisms* (supplement to 'Philosophy', 82), Cambridge, 1982.

११. बेकन काय म्हणतो पहा : "There are and can be only two ways of searching into and discovering truth. The ons flies from the sense and particulars to the most general axioms, and from these principles to... the discovery of middle axioms. And this way is now in fashion. The other derives axioms from the senses and particulars, rising by a gradual and unbroken ascent, so that it arrives at the most general axioms last of all. This is the true way, but as yet untried." Francis Bacon, *Selected Writings*, The Modern Library. हा भाग उद्‌धृत केला आहे श्री. अ. भि. शहा यांनी. A. B. Shah, *Scientific Method*, Allied, Bombay, 1964, p.35.

मार्क्सचे फॉयरबाखवरील दुसरे टिपण मी लेखात दिले आहे ते बेकनच्या या विचारांशी ताडून बघता येईल. तसेच बेकनची विगमन (induction) पद्धत सांगताना पाध्ये जे सांगतात– (विगमन – अभ्युपगम – चाचणी–निष्कर्ष) – तसे बेकन म्हणत नाही.

१२. Leszek Kolakowski, *The Self-Poisoning of the Open Society*, in : *Survey*, Autumn, 1980.

---

। सत्फलाय सहकारिता ।

वाईकरांच्या जिव्हाळ्याची...

**दि वाई अर्बन को-ऑप. बँक लि.**

वाई (सातारा) फोन नं ७

★ मुदत ठेवींवर आकर्षक व्याज ★ बचतीच्या विविध योजना ★ सुलभ हप्त्यांची हायरपरचेस योजना ★ सेफ डिपॉझिट लॉकर्सची सोय ★ तत्पर सेवा

शाखा : पांचगणी; फोन नं. २२०

प. कृ. अभ्यंकर B. COM. LL. B. मॅनेजर

द. न. पटवर्धन चेअरमन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# जॉन मेनार्ड केन्स : व्यक्ती आणि कार्य*

सी. पं. खेर

## उपोद्घात

समाजविज्ञानात युगप्रवर्तक बदल घडवून आणणाऱ्या मोजक्या प्रतिभावंतांत चॉर्ड जॉन मेनार्ड केन्स या ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञाचे नाव प्रामुख्याने घेतले जाते. साम्यवादी जगात मार्क्सला जे स्थान आहे, तेवढेच स्थान साम्यवादी जगाबाहेर केन्सला आहे. सरकारी सर्वार्थशाही आणि शोषणयुक्त मुक्त भांडवलशाही ही दोन टोके झिडकारून संमिश्र अर्थव्यवस्थेचा जो प्रयोग आज अमलात येत आहे त्याचे श्रेय मुळात केन्सलाच द्यायला हवे. केन्सला जाऊन आज सदतीस वर्षे झाली. त्याचा **द जनरल थिअरी ऑफ एंप्लॉयमेंट, इंटरेस्ट अँड मनी** (१९३६) हा ग्रंथ प्रसिद्ध होऊन सत्तेचाळीस वर्षे झाली तरी या ग्रंथाचा प्रभाव अद्याप इतका सर्वव्यापक आहे, की एका अर्थाने आपण सर्वजण 'केन्शियन'[१] ठरतो.

केन्सचे अर्थशास्त्रातील हे क्रांतिकारी महत्त्व जाणून त्याच्या सिद्धान्ताचा परिचय करून देण्याचा एक नम्र प्रयत्न मी माझ्या "केन्स आणि शुम्पीटर यांचे अर्थशास्त्र" (१९५८) या पुस्तकात केला. कै. प्रा. श. ह. मुंजे यांनी "केन्सची रोजगारीची मीमांसा" करणारे एक पुस्तक (१९६०) मराठीत प्रसिद्ध केले आहे. केन्सच्या सिद्धान्तांचा परिचय या पुस्तकांतून होत असल्याने त्याची पुनरावृत्ती या लेखात करण्याची जरुरी नाही. परंतु केन्सचे कार्य एवढ्यापुरते मर्यादित नाही. आंतरराष्ट्रीय नाणे निधी व बँक स्थापन करण्यात त्याने जिवाचे रान केले. त्यातच तो खचला, खपला. त्याआधी दुसऱ्या महायुद्धाच्या काळात या युद्धाचा खर्च भागविण्याकरिता त्याने नवीन तंत्र पुरस्कारले. त्याच्या व्यवसायाची सुरुवात ब्रिटनमधील "इंडिया ऑफिसात" (१९०६–१९०८) झालेली होती. या संबंधातून १९१३ साली त्याने भारतीय चलन व वित्तव्यवस्थेवर **इंडियन करन्सी अँड फिनान्स** हा ग्रंथ लिहिला. अशा रीतीने भारतात प्रत्यक्ष पाऊल न ठेवताही भारताशी त्याचा संबंध आलेला आहे. या त्याच्या कार्याची आपल्याला माहिती असावयास हवी. उपर्युक्त 'जनरल थिअरी...' हा ग्रंथ लिहिण्यामागे शुम्पीटरने ज्याला 'दृष्टी' (व्हीजन) म्हटले आहे ती कोणती होती, केन्सचे कोणते तत्त्वज्ञान होते हेही आपण जाणून घ्यायला हवे. केन्सशी निगडित असणाऱ्या या विषयांचे विवेचन या लेखात करण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

## केन्स कालबाह्य ठरतो काय ?

सुरुवातीस एका शंकेचे निरसन आपण करून घ्यायला हवे. केन्स आता जुना झाला, असे म्हटले जाते. कदाचित १८८३ ते १९४६ या ६३ वर्षांच्या जीवनौघाला उद्देशून हे म्हटले जात असावे. खरे तर केन्सच्या मृत्यूनंतर केन्सचा प्रभाव वाढला. दुसरे महायुद्ध संपल्यानंतर त्याच्या अभ्यासाकडे खोल लक्ष पुरवले गेले किंवा ज्या भीषण मंदीच्या आणि बेकारीच्या परिस्थितीत 'जनरल थिअरी...' हा ग्रंथ लिहिला गेला, ती परिस्थिती नाहीशी होऊन दुसऱ्या महायुद्धानंतर उलट पूर्ण रोजगारीच्या जवळपास व भाववृद्धीच्या परिस्थितीत पाश्चिमात्य राष्ट्रे वावरत असल्याने 'जनरल थिअरी'...मधील सिद्धान्त लागू होत नसावा अशी वरवर समजूत होत असावी. परंतु या सिद्धांताने विश्लेषणाची जी साधने आपल्याला दिलेली आहेत व जी दिशा दाखविलेली आहे ती काही जुनी झालेली नाही व तत्संबंधीचा विचार काही जुना झालेला नाही.

---

* जगप्रसिद्ध ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञ जॉन मेनार्ड केन्स ह्याच्या जन्मशताब्दीनिमित्त हा लेख नवभारतात प्रसिद्ध करीत आहोत –संपादक

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दोन उदाहरणे देतो. सर जॉन हिक्स यांनी १९७३ साली केन्सच्या अर्थशास्त्रातील उणिवा पुनः मांडलेल्या आहेत. केन्सच्या सिद्धान्ताची मीमांसा करणाऱ्या प्रोफेसर उडले डिलार्ड यांच्या पुस्तकाची भारतीय आवृत्ती १९७२ साली निघालेली आहे. केन्सचे सिद्धान्त विचारप्रवर्तक असल्याचीच ही लक्षणे नव्हेत काय ? जून १९७५ च्या ( ब्रिटिश ) ' इकॉनॉमिक जर्नल ' मध्ये केन्सच्या समग्र साहित्याच्या काही खंडांवर एक परीक्षणात्मक, प्रदीर्घ लेख प्रोफेसर डॉन पॅटिन्किन् यांनी लिहिलेला आहे. यात त्यांनी केन्सच्या अ ट्रॅक्ट ऑन मॉनेटरी रिफॉर्म, ( १९२३ ) , ट्रिटीज ऑन मनी ( १९३० ) आणि ' जनरल थिअरी...' ह्या ग्रंथांतील पैशाच्या सिद्धांतासंबंधीचा मागोवा घेतलेला आहे. ' जनरल थिअरी'बद्दल त्यांनी पुढील मत शेवटी नमूद केलेले आहे :

" 'जनरल थिअरी' बद्दल सांगायचे तर– या ग्रंथाने क्रांती केलेली असून तो सकळ अर्थव्यवस्थेच्या प्रश्नाबद्दलच्या आपल्या पायाभूत विचारपद्धतीला वळण लावण्याचे कार्य अद्याप करीत आहे. आणि म्हणून त्याचे– निदान काही भागांचे– वाचन म्हणजे एक बौद्धिक मेजवानी असून, अर्थशास्त्रज्ञ होऊ पाहणाऱ्याला आजदेखील ते टाळता येणार नाही."[२]

हिक्स आणि पॅटिन्किन् हे दोघेही केन्सचे कठोर टीकाकार आहेत, केन्सच्या व्यक्तिमाहात्म्याने प्रभावित झालेले त्याचे शिष्य नव्हेत, हे लक्षात टेवले पाहिजे.

अर्थात केन्सचा ' जनरल थिअरी...' हा ग्रंथ दोषरहित आहे असे नाही. आणि आजचे अर्थशास्त्रीय सिद्धांत केन्सच्या मूळ मांडणीतच राहावेत असेही कुणी मानणार नाही. कारण अर्थशास्त्र हे विज्ञान म्हणून आणि परिस्थितिजन्य धोरण ठरविणारे म्हणून सतत विकसित, व्यापक व सघन होत राहते. पण त्याचा धागा ' जनरल थिअरी...'त लागतो हे निश्चित. किंबहुना वर म्हटल्याप्रमाणे आजचे अर्थवाङ्मय इतके ' केन्शियन ' बनलेले आहे, की यात केन्सचे कुठले व केन्समुळे कुठले हे शोधणे नदीचे मूळ शोधण्यासारखे कठीण ![३]

केन्स अद्याप इतिहासजमा झालेला नाही. पण तो तसा झाला आहे असे समजले, तरी अर्थविज्ञानाच्या इतिहासात ' जनरल थिअरी...'चे स्थान ठळक व अढळ आहे. या ऐतिहासिक ग्रंथाचे परिस्थितिजन्य नवीन दृष्टिकोनातून भाष्य करणे महत्त्वाचे ठरेल. परंतु असे भाष्य केन्सपूर्व व केन्सनंतर विस्तारलेल्या अर्थवाङ्मयाचा पूर्ण परिचय व अभ्यास झाल्यानंतर आपल्याला मांडता येईल. अशा वाङ्मयाच्या परिचयाविना मराठीत असा प्रयत्न दुर्बोध ठरेल.

### केन्सची जीवनरेखा

केन्सचा जन्म ५ जून १८८३ रोजी झाला (मार्क्सच्या मृत्यूचे हे साल आहे). त्याचे वडील डॉ. जॉन नेव्हिल केन्स हे राज्यअर्थशास्त्र व तर्कशास्त्र या विषयांचे नाणावलेले अध्यापक व केंब्रिज युनिव्हर्सिटीचे कुलसचिव होते. त्याची आई एके काळी ( १९३२ ) केंब्रिजची महापौर होती. जॉन मेनार्ड केन्स हा त्यांचा पहिला मुलगा. केंब्रिजच्या सांस्कृतिक वातावरणात केन्स वाढला. ईटन कॉलेजात त्याने शिक्षण घेतले. आणि १९०२ साली किंग्ज कॉलेजसाठी त्याने गणित व अभिजात (ग्रीक व लॅटीन ) वाङ्मय याकरिता शिष्यवृत्ती मिळवली. तो बारावा रँगलर होता. १९०६ त त्याने ब्रिटिश सिव्हिल सर्व्हिसमध्ये प्रवेश केला. गंमत अशी, की या परीक्षेत गणित व अर्थशास्त्र या विषयांत त्याला सर्वांत कमी मार्क पडले होते. नोकरीसाठी त्याने इंडिया ऑफिस निवडले. पण इथे त्याचे मन फारसे रमले नाही. बऱ्याचदा त्याला काही काम नसायचे. आपले खासगी काम ऑफिसात करायची सवय त्याला लागते की काय अशी त्याच्या वडिलांना भीती पडली होती. नंतर त्याची बदली संरक्षण खात्यातून महसूल, आकडेवारी, व्यापार या खात्यांत झाली. पण या कामापेक्षा 'अ ट्रिटीज ऑन प्रॉबेबिलिटी' ह्या सिद्धान्तादर प्रबंध लिहिण्यात त्याने अधिक श्रम खर्च केले. हा ग्रंथ १९२१ त प्रसिद्ध झाला. बर्ट्रांड रसेलने या ग्रंथाचा गौरवपूर्ण उल्लेख केलेला आहे. या प्रबंधाने त्याला किंग्ज कॉलेजची वर्षाला १०० पौंडांची फेलोशिप मिळाली. पण या फेलोशिपचा त्याला तेवढा मोह पडला नाही, म्हणून मग आल्फ्रेड






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मार्शलने आपल्या खासगी संपत्तीतून वर्षाला १०० पौंड देऊ केले. आणि ५ जून १९०८ मध्ये केन्सने सनदी नोकरीचा राजीनामा दिला. या दोन वर्षांत सरकारी खाते कसे कार्य करते याचा त्याला अनुभव आला; शिवाय भारताच्या ( विशेषतः चलन-विषयक ) प्रश्नांचा त्याला जवळून अभ्यास करता आला. एक तर भारतीय चलनाने सर्वांचे लक्ष वेधून घेतले होते व या विषयावर बऱ्याच समित्या नेमल्या गेल्या होत्या. कदाचित यामुळे त्याने इंडिया ऑफिसची निवड केली असावी. १९१३ साली त्याने भारतीय चलन व वित्त व्यवस्थेवर इंडियन करन्सी अँड फिनान्स हा ग्रंथ प्रसिद्ध केला. याबद्दलची चर्चा पुढे येईल.

केंब्रिजमध्ये केन्स रमला, बहरला. किंग्ज कॉलेजचा त्याला फेलो नेमण्यात आले व पुढे कॉलेजचा खजिनदार करण्यात आले. अर्थशास्त्राव्यतिरिक्त सौंदर्यशास्त्र व तत्त्वज्ञान या विषयांची त्याला आवड होती. केन्स व बर्ट्रांड रसेल हे दोघे आपले आवडते शिष्य होते असे तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक व्हाइटहेड म्हणत असे. केंब्रिजला राहूनही केन्सला आपला लंडनचा संबंध तोडावयाचा नव्हता. त्याचे वास्तव्य आता केंब्रिज व लंडन असे दोन्हीकडे होऊ लागले. या प्रयत्नात व्हिक्टोरिया काळातील वाङ्मयीन टीकाकार व विचारवंत लेस्ली स्टीफन यांच्या मुलांशी त्याचा स्नेह जडला. या स्नेहीमंडळींच्या गटाला "ब्लूम्सबरीचा संघ" म्हणून संबोधले जाई. या संघात लिटन स्ट्रॅची, लिओनार्ड वूल्फ, डंकन ग्रँट यांसारखे सुप्रसिद्ध साहित्यिक व चित्रकार होते. या संघातर्फे डायघीलेव्ह यांच्या रशियन ( बॅले ) नृत्य–पथकाशी त्याचा संपर्क आला. या कला–पथकातील लीडिया लोपोकोव्हा या नर्तकीशी त्याचा परिचय वाढला व १९२५ मध्ये तिच्याशी त्याने लग्न केले. आपल्या पत्नीच्या कलागुणांना केंब्रिजमध्ये वाव मिळावा यासाठी आर्ट थिएटर स्थापन करण्यात त्याने पुढाकार घेतला. कलेशी असलेल्या संबंधांमुळे नॅशनल गॅलरीचा त्याला विश्वस्त करण्यात आले (१९४१). आर्ट्स कौन्सिलचे १९४५ त त्याला अध्यक्षपदही मिळाले.

१९११ पासून इकॉनॉमिक जर्नलचा तो जवळजवळ ३४ वर्षे संपादक होता. त्याच्या संपादकत्वाखाली या नियतकालिकास चांगले, व्यवस्थित व प्रौढ स्वरूप आले. या त्रैमासिकातून अर्थविज्ञानाला त्याने प्रमुख स्थान दिले. लेखकांनी आपले लिखाण सुविदित करावे यासाठी तो व्यग्र असे. त्यांच्याशी तो पत्रव्यवहार करून त्यात सुधारणा करायला लावी. त्याने नाकारलेल्या लेखावरही तो आपली मते देई. तरुण लेखकांना त्यामुळे उत्तेजन मिळे. 'नेशन' या साप्ताहिकाचा व पुढे ते 'न्यू स्टेट्स्मन अँड नेशन' यामध्ये विलीन झाल्यावर त्याचा तो अध्यक्ष होता. पण संपादकीय धोरणात कधीही त्याने ढवळाढवळ केली नाही. वित्त व गुंतवणूक यांवरील टिप्पणी केन्स या साप्ताहिकातून लिहीत असे.

पहिल्या महायुद्धाच्या काळात त्याने वित्तमंत्रालयात कार्य केले ( १९१५–१९१९ ). लॉर्ड रीडींग यांच्या शिष्टमंडळाचा सदस्य या नात्याने त्याने अमेरिकेचा प्रवास केला. वित्तमंत्र्याचा प्रतिनिधी म्हणून पॅरिस येथील शांतता परिषदेत, व सुप्रीम इकॉनॉमिक कौन्सीलवर त्याने काम केले. जर्मनीशी खंडणी आणि हानीपूर्तीसंबंधी करार करताना जर्मनीला पिळून काढणाऱ्या प्रयत्नामुळे त्याने राजीनामा दिला. या करारामुळे तो इतका विचलित झाला होता, की त्याने लगेच इकॉनॉमिक कॉन्सिक्वेन्सिस ऑफ पीस ( १९१९ ) हा ग्रंथ लिहिला व तो तत्काळ नावाजला गेला.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात त्याने वित्तमंत्रालयात पहिल्याइतके प्रत्यक्ष काम केले नसले, तरी वित्तमंत्रालयाच्या सल्लागार समितीवर याची नेमणूक झाली. अमेरिकन मदत मिळवण्याची त्याने खटपट केली. या आधी "युद्धाचा खर्च कसा चालवावा" हे छोटे पुस्तक त्याने लिहिले. आंतरराष्ट्रीय बँकेच्या स्थापनेसाठी त्याने हिरिरीने भाग घेतला.

या दोन युद्धांमधील अस्थिर शांततेच्या काळात केन्सचे नावाजलेले ग्रंथ म्हणजे द्विखंडात्मक 'ए ट्रिटीज ऑन मनी' (१९३०) व 'जनरल थिअरी ऑफ एंप्लायमेंट, इंटरेस्ट अँड मनी' ( १९३६ ). त्याचे 'एसेज इन बायॉग्राफी' (१९३३) याच काळातील. त्याच्या विद्वत्तेचे, प्रतिभेचे, विनोदाचे, उन्मेष या निबंधांत आढळतात. केन्सची प्रतिभा



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बहुप्रसवा होती. एकंदर १७ पुस्तके; पैसा ' व्याज, किंमती व भाववृद्धी या विषयांवर ३१, आंतरराष्ट्रीय नाणेव्यवहारावर ४९, बेकारी, रोजगार व मजुरी या विषयांवर २६, उपभोग, संचय, गुंतवणूक व प्राप्ती यांवर ८, युद्ध व शांतता, युद्धकर्ज, खंडणी व हानीपूर्ती या विषयांवर ३३, राजकारण व तत्त्वज्ञान यांवर १६, चरित्रात्मक १६, विविध १३ व पुस्तक-परीक्षणात्मक २० लेख त्याने लिहिले.

त्याशिवाय त्याचा ग्रंथाच्या आधी व नंतर झालेला पत्रव्यवहार वेगळाच. मसुद्याच्या रूपात पूर्ण ग्रंथ लिहून तो आपल्या मित्र–शिष्य– परिवारात प्रसृत करण्याची त्याची सवय होती. त्यांची टीका ध्यानात घेऊन त्यानुसार ( त्यांचे ऋण मान्य करून) त्यात बदल करण्याची तो तत्परता दाखवी व नंतरच ग्रंथ प्रसिद्ध होई. हे मसुदे व पत्रव्यवहार यांसकट सगळा लेखनसंग्रह केन्सचे स्मारक म्हणून ( ब्रिटिश ) रॉयल इकॉनॉमिक सोसायटीने २५ खंडांतून प्रसिद्ध करावयाचे योजून ते खंड एव्हाना प्रसिद्ध केले आहेत.

अभ्यास व लेखन यांत असा तो गुंतून पडला तरी व्यवहारापासून त्याची फारकत झालेली नव्हती. किंग्ज कॉलेजच्या निधीची रक्कम चाणाक्षपणे गुंतवून १९२४ तील मूळ ३०,००० पौंडांपासून ३,८०,००० पौंडांइतकी वाढवली. नॅशनल म्युच्युअल लाइफ अॅश्यूरन्स सोसायटीचा तो अध्यक्ष होता. त्याने एक गुंतवणूक कंपनी चालवली. परदेशी हुंडणावळीच्या बाजारात आपली गुंतवणूक फिरवून त्याने बरीच माया साठवली. ती पाच लाख पौंडांहून जास्त भरते हे कुणाला खरेदेखील वाटायचे नाही.

आंतरराष्ट्रीय नाणे निधी व बँक स्थापन करतानाच्या चर्चेत अमेरिकन विरोधामुळे त्याला बराच ताण व अस्वस्थता सोसावी लागली. इतकी, की १९३७ मध्ये हृदयविकाराचा एक झटका येऊन आधीच अशक्त झालेल्या शरीरावर १९४६ मध्ये पुन्हा एक हृदयविकाराचा झटका येऊन त्याचा अंत झाला (२१ एप्रिल १९४६).

केन्सला जाऊन आता पस्तीस वर्षे झाली तरी अद्याप त्याचा प्रभाव कमी झालेला नाही. ' जनरल थिअरी..." या ग्रंथाइतका चर्चिलेला अन्य ग्रंथ अर्थशास्त्रीय वाङ्‌मयात नसेल.

### भारतीय चलन व वित्तव्यवस्था

"भारतीय चलन व वित्तव्यवस्था" (इंडियन करन्सी अँड फिनान्स) केन्सचा पहिला व सर्वांनी वाखाणलेला ग्रंथ आहे. तपशिलात शिरण्याची व सिद्धांताचा आधार घेऊन धोरण निगमनण्याची त्याची वृत्ती या ग्रंथात अगदी स्पष्ट आढळते. त्याची लेखनशैली इथे मोठी सुलभ आहे. या ग्रंथाने केन्सचे भारताशी नाते जोडले आहे.

ब्रिटिशांनी भारत पादाक्रांत केल्यावेळी त्यांना तीन महत्त्वाचे चलनविषयक प्रश्न भेडसावीत होते : १. देशांतर्गत चलन कोणत्या प्रकारचे असावे, २. रुपयाचे व ( ब्रिटिश ) स्टर्लिंगचे विनिमयप्रमाण कोणते असावे व ३. कागदी चलनाचे स्वरूप व तारण कसे असावे व ते कुठे ( म्हणजे भारतात का ब्रिटनमध्ये ) ठेवावे. तत्पूर्वी भारतात सुमारे ९९४ तऱ्हांची वेगवेगळ्या वजनाची, कसाची सोन्याचांदीची नाणी चलनात होती. यामुळे व्यापारवाढीस अडथळा येत होता. ब्रिटिशांनी चांदीच्या रुपयाचे एकच चलन कायदेशीर केले. पण १८७४–७८ या काळात सर्व जगातच चांदीचे चलन नाहीसे केले गेल्याने चांदीची किंमत घसरायला लागली होती. भारतातही चांदीचे विमुद्रीकरण करावे व सुवर्णमानक स्थापन करावे असा विचारप्रवाह होता. या पार्श्वभूमीवर वरील चलनविषयक प्रश्न सोडविण्यासाठी हर्शेल( १८९३), फौलर (१८९८) समित्या नेमल्या. फौलर समितीने भारतात सुवर्णमानक अमलात आणण्याचा व सोन्याची खुली आयातनिर्यात ठेवण्याचा अंतिम हेतू बाळगावा असे सुचवले होते. सरकारने या सूचना स्वीकारल्या तरी व्यवहारात बँक ऑफ बेंगालचे त्यावेळचे उपसचिव व खजिनदार श्री. ए. एम्. लिंडसे यांनी सुचवलेली पद्धत अमलात राहिली. या लिंडसे–योजनेनुसार भारतात चांदीच्या रुपयाचे चलन व परदेशी देणी फेडण्यासाठी लंडनमधील यासाठी स्थापन केलेल्या सुवर्ण मानक निधीचा वापर अशा तऱ्हेचे (ज्याला केन्सने "भारतीय चलन व वित्तव्यवस्था" या आपल्या ग्रंथात ' सुवर्ण–विनिमय–मानक ' म्हणून संबोधले ते )सुवर्ण–विनिमय मानक भारताने

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वीकारलेले होते. केन्सच्या मते सुवर्ण–विनिमय–मानक व्यवहारणारा भारत हा जगातील पहिला देश होय.

भारताने हर्शेल व फौलर समित्यांनी सुचविल्याप्रमाणे सुवर्णमानक स्वीकारू नये असे केन्सचे मत होते. ब्रिटनमध्ये त्यावेळी सुवर्ण–मानक जारी होते व ते स्वीकारण्याचा बहुतेक सर्व देशांनी आदर्श ठेवला होता. पण असा आदर्श बाळगणे केन्सच्या मते चुकीचे होते. याचे कारण ब्रिटनची काही खास वैशिष्ट्ये हे होय. ब्रिटनमधील बँकिंग व्यवहाराची उत्तम व्यवस्था, बँकांनी प्रसृत केलेल्या नोटांवर लोकांचा विश्वास, व त्यामुळे प्रत्यक्षात सोन्याच्या नाण्यांऐवजी चेक्सचा अधिकाधिक वापर, चलनात लवचीकपणा आणणारा हुंडीबाजार, शिवाय लंडनच्या नाणेबाजाराचे जागतिक महत्त्व सुवर्ण–मानकाचा स्वीकार करू इच्छिणाऱ्या इतर देशांनी दृष्टिआड करू नये. ब्रिटनमध्ये कायद्याने सुवर्ण–मानक असले तरी व्यवहारात नोटांचे व चेक्सचे चलन मुख्यत्वे वापरात होते. प्रत्यक्ष सोन्याच्या नाण्यांचा व्यवहार कमी होता. त्यामुळे परदेशी येण्यादेण्यासाठी सोन्याचा अधिक उपयोग होत असे. आणि ब्रिटन हा धनको देश असल्याने हुंडणावळीचा दर व पुनश्च कटमितीचा दर यांतून सोन्याची निर्यात नियमित करता येई. तेव्हा ब्रिटनचे उदाहरण इतर देशांना लागू पडत नाही व भारतासह इतर युरोपीय देशांनीही सुवर्ण–विनिमय–मानक स्वीकारावे असे केन्सने प्रतिपादन केले.

भारतात प्रत्यक्ष सुवर्णमानक आणण्याचा प्रयोग फसला होता याचे आणखी एक कारण म्हणजे चलनाव्यतिरिक्त सोन्याला भारतात असलेली प्रचंड मागणी हे आहे. दागिन्यांसाठी, संपत्ती साठविण्यासाठी सोन्याला भारतात इतकी मागणी असते, की सोन्याचे प्रसृत केलेले नाणेदेखील परत चलनात न येता त्यांचा (अप) संचय होत जाई. केन्सच्या अंदाजाप्रमाणे १९१३ पूर्वीच्या ६० वर्षांत जवळजवळ ४५० कोटी रुपयांचे सोने ( त्याआधीचा साठा वगळता) भारतात साठवले गेले असले पाहिजे. इतक्या प्रचंड प्रमाणावर चलनाव्यतिरिक्त सोन्याचा वापर होत असल्याने, सोन्याचे वाढते उत्पादन सामावून घेतले जात असल्याने, लंडनमधील चलनवाढीला आळा घालण्यात भारताने साहाय्यच केले आहे असे केन्सने जाताजाता नमूद केले आहे.[४]

भारतासाठी एक स्टेट बँक असावी अशी केन्सने सूचना केली आहे. त्यामुळे भारत-मंत्रालयावर जी बँकिंग व्यवहाराची जबाबदारी पडते ती नाहीशी होईल, सरकारने राखलेल्या निधींची कार्ये स्पष्ट राहतील व आपला पैसा रोख न ठेवता वापरता येईल, बँकेमुळे चलनव्यवस्थेत लवचीकता येईल इत्यादी कारणे केन्सने दिलेली आहेत. अशी बँक येण्यास १९३५ साल उजाडावे लागले.

भारतीय चलनामागील सोन्याचे बरेचसे तारण त्यावेळी लंडनमध्ये ठेवलेले होते याबद्दल भारतात संशय व्यक्त केला जात होता. परंतु भारतीय चलनव्यवस्थेचा अभ्यास केल्यास असला संशय घेण्यात काही तथ्य नाही असे केन्सने दाखवून दिले आहे. भारतास ब्रिटनचे देणेच लागत असल्याने लंडनमध्ये निधी ठेवणे सोईचे पडते असे त्याने नमूद केले आहे. भारतास होम चार्जिसच्या रूपाने ब्रिटिश सनदी नोकरांचे पेन्शन, पगार द्यावे लागत (१९१३ साली ही रक्कम १,८९,८६,००० पौंड होती), भारतीय रेल्वेत गुंतवलेल्या ब्रिटिश गुंतवणुकीवर व्याज द्यावे लागे, भारतात होणाऱ्या ब्रिटिश मालाच्या आयातीचे देणे फेडावे लागे. त्यामुळे ब्रिटनने भारताची पिळवणूक चालविलेली आहे असा भारतीय नेत्यांचा दावा होता. तेव्हा केन्सने "गृहीत" धरल्याप्रमाणे होम चार्जिसचे देणे गृहीत मानता येत नाही. या गृहीतकावर आधारून रुपया व स्टर्लिंगचा विनिमयदर १ रुपयास १ शि. ४ पेन्स ठरवणे हेही भारताच्या हिताविरोधी जाणारे होते. यामुळे भारताच्या परदेशी कर्जात वाढ झाली. अर्थात ही वाढ केवळ अर्थशास्त्रीय कक्षेतील नव्हती; राजकीय होती. यामुळे भारतीय दृष्टीने त्याचा केन्सने विचार केलेला नसावा.

"भारतीय चलन व वित्तव्यवस्था" हा ग्रंथ केन्सच्या भारताच्या चलनव्यवस्थेच्या खोल अभ्यासाचे व अधिकाराचे द्योतक आहे. भारताच्या चलनव्यवस्थेचा इतिहास पाहताना केन्सच्या या ग्रंथाला मुळीच डावलता यावयाचे नाही.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हा ग्रंथ जवळजवळ पुरा होत असता व प्रकाशनाच्या वाटेवर असता भारतीय चलनव्यवस्थेची तपासणी करण्यासाठी एक रॉयल कमिशन नेमण्याचे घाटत होते. या कमिशनचे चिटणीसपद केन्सला द्यावे असेही घाटत होते. पण आपण असा ग्रंथ प्रसिद्ध करीत असल्याने आपली या कमिशनवरील नेमणूक योग्य ठरेल काय असा प्रश्न केन्सने उपस्थित केला. केन्सने चिटणीसपद न स्वीकारता नुसते सभासद राहावे व आपल्या अभ्यासाचा कमिशनला फायदा द्यावा असे ठरविण्यात आले. याबद्दल केन्सचे चरित्रकार रॉय हॅरड यांच्या शब्दांत सांगायचे तर, " केवढा सरळपणा हा ! "

## शांततेचे आर्थिक परिणाम

( इकॉनॉमिक कॉन्सिक्वेन्सिस ऑफ पीस )

भारतीय चलनव्यवस्थेची तपासणी करण्यासाठी नेमलेल्या समितीवर केन्सला पूर्ण सभासद म्हणून घेतले गेले. हे काम करीत असताना पहिले महायुद्ध उद्‌भवले व १९१५ च्या मे महिन्यात वित्तमंत्रालयातील " विभाग एक "मध्ये त्याला सामावून घेण्यात आले.

पहिले महायुद्ध व त्यासाठी सक्तीची सैन्यभरती याला " विवेकपूर्वक विरोध " करणारा एक गट होता. यात रसेलप्रमाणे स्ट्रेंची आदी ब्लूम्सबरी संघातील सभासद होते. त्यांना केन्सचे मंत्रालयातील काम स्वीकारणे पसंत नव्हते. केन्सच्या मते, " आपण या युद्धात अडकलेलोच आहोत व ते आपल्याला खेळायलाच हवे. त्याशिवाय अन्य व्यवहार्य पर्याय नाही. " ब्लूम्सबरी संघापासून केन्स दुरावला तो इथपासून.

युद्धासाठी सक्तीची सैन्यभरती करणारा कायदा ब्रिटिश सरकारने पास केला. जे आधीच सरकारी सेवेत होते त्यांना यातून वगळले गेले होते. परंतु सक्तीमुळे स्वतःचा निर्णय स्वतः घेण्याचे स्वातंत्र्य हिरावले जाते या कारणास्तव केन्सचा सक्तीच्या सैन्यभरतीस विरोध होता व हा आपला विरोध दर्शवून सक्तीच्या सैन्यभरतीपासून त्याला मोकळीक हवी होती. सत्तेला शरण जाणे व आपले कर्तव्य कोणते हे ठरविण्याचा अधिकार दुसऱ्यावर सोपवणे आपल्या विवेकाला न पटणारे आहे व म्हणून सक्तीच्या सैन्यभरतीपासून आपल्याला मुक्तता मिळावी अशा तऱ्हेचे पत्र केन्सने स्थानिक ट्रायब्यूनलला पाठविले. आपला विवेकपूर्ण विरोध स्पष्टपणे व्यक्त करावा हे जितके केन्सला वाटले त्याहून अधिक मुत्सद्देगिरी स्थानिक ट्रायब्यूनलने दाखविली. केन्स हा आधीच सनदी नोकर असल्याने तो सक्तीच्या सैन्यभरतीपासून आपोआपच मुक्त असून त्याच्या अर्जाचा विचार अनावश्यक आहे असे ट्रायब्यूनलने ठरवले.

१९१८ च्या सुमारास विजय दृष्टिपथात दिसू लागला व जर्मनीकडून खंडणी किती वसूल करावयाची या प्रश्नाकडे वित्तमंत्रालयाचे लक्ष वेधले. खंडणीचा प्रश्न केन्सकडे आला. केन्सच्या अंदाजाप्रमाणे युद्धविरामाच्या अटीनुसार ही खंडणी ४०० कोटी पौंड भरणारी होती. पण जर्मनीचा मोडलेला परदेशी व्यापार, गेलेला प्रदेश व नाहीशा झालेल्या व्यापारी बोटी लक्षात देऊन तिची ( फेडण्याची ) पात्रता पाहिल्यास ही रक्कम २०० कोटी पौंड ठरवावी व ती वर्षाला १० कोटी पौंड याप्रमाणे वसूल करावी असे केन्सने फक्त निवेदन तयार केले. वित्तमंत्रालयास ही रक्कम योग्य वाटत होती. परंतु फ्रान्स, ऑस्ट्रेलिया आदी युद्धसमितीवरील इतर देशांना ही रक्कम मान्य झाली नाही. त्यांच्या मते जर्मनीकडून २४०० कोटी पौंडाइतका युद्धाचा सगळा खर्च वसूल करावा असे होते. पण एवढी रक्कम वसूल कशी करावयाची याबद्दल कुणाला कल्पना नव्हती असे दिसते. जर्मन लोकांवर कर लादून रक्कम गोळा करावी व त्याचा भरणा केला जावा असा काहीसा त्यांचा अंदाज असावा. पण जर्मन चलनातून दोस्त राष्ट्रांच्या चलनात परिवर्तन घडवून आणताना, त्यात वस्तू व मौल्यवान धातू यांच्या प्रत्यक्ष देवाणघेवाणीचा प्रश्न अंगभूत असतो हे जाणून घेण्यास कुणी तयार नव्हते. तसेच उद्ध्वस्त जर्मनीला वस्तूंचा– विशेषतः अन्नाचा–पुरवठा केला जावा असे युद्धविरामाच्या करारात एक कलम होते. जर्मनीची पुनः बांधणी करावी, तिची आर्थिक नाकेबंदी होऊ नये असे केन्सला मनापासून वाटत होते. परंतु शत्रूला चांगला धडा शिकवला जावा, सगळा युद्धाचा खर्च भरून निघावा असा द्वेषपूर्ण हेका धरणाऱ्या दोस्तांनी केन्सचे म्हणणे ऐकून घेतले नाही.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

यावेळी केन्सने आणखी एक योजना तयार केली. या योजनेप्रमाणे जर्मनीने १०० कोटी पौंडांचे कर्जरोखे उभारावे. इतर शत्रूराष्ट्रांनीही या प्रमाणात कर्जरोखे उभारावे. त्याची हमी युरोपातील बहुतेक राष्ट्रांनी द्यावी. या कर्जरोख्यांच्या आधारावर अमेरिकेच्या फेडरल रिझर्व्ह बँकेने जर्मनीला कर्ज द्यावे व या कर्जातून जर्मनीने आपली खंडणी फेडीत जावे. ब्रिटिश सभासदांच्या मते अशी खंडणी एकूण ५०० पौंड ३० वर्षांत फेडावयाची होती. परंतु असे व एवढे कर्ज देण्यास अमेरिकन कांग्रेसची मान्यता मिळावयाची नाही असे अमेरिकेच्या त्या वेळच्या अध्यक्षाने (वुड्रो विल्सन) स्पष्ट केल्याने केन्सची ही योजना बारगळली. जर्मनीच्या पात्रतेचा विचार न करता तिच्यावर बेफाम खंडणी लादण्याच्या (शांतता-करारात कोणतीच रक्कम अखेर नमूद केली गेली नाही) दोस्तांच्या प्रयत्नाने विटून जाऊन व आपल्या प्रयत्नांना यश न आल्याने हताश बनून जून १९१९ त केन्सने आपल्या पदाचा (ब्रिटिश वित्तमंत्रालयाचा प्रतिनिधी या नात्याने) राजीनामा दिला.

या एकंदर प्रश्नाची सविस्तर चर्चा करणारे "शांततेचे आर्थिक परिणाम" या नावाचे एक पुस्तक केन्सने लगेच प्रसिद्ध केले (डिसेंबर १९१९). शुम्पीटरने या पुस्तकावर चांगला अभिप्राय व्यक्त केला.[५]

या ग्रंथात केन्सने तीन मुद्दे मांडलेले आहेत :

१. शांततेच्या अटी लादताना उदारपणा दाखवावयास हवा.

२. खंडणी म्हणून मागणी केलेली रक्कम अव्यवहार्य आहे.

३. सीमेबाबतच्या (फ्रेंच-जर्मन) राजकीय प्रश्नापेक्षा यूरोपचे आर्थिक प्रश्न फार महत्त्वाचे आहेत.

वर म्हटल्याप्रमाणे केन्सने २०० कोटी पौंडांची खंडणी ३० वर्षांत वसूल करावी असे सुचवले होते; तर दोस्त राष्ट्रांना युद्धाचा सगळा खर्च (म्हणजे अंदाजे २४०० कोटी पौंड) वसूल करण्याची इच्छा होती. हा आकडा सर्वसंमत न झाल्याने शेवटी कोणताही आकडा लिहिला गेला नाही. १८७१ मध्ये झालेल्या फ्रँको-रशियन युद्धात जर्मनांनी २१.२ कोटी पौंड तेवढे वसूल केले होते. पुढे १९३१ मध्ये अमेरिकेचे देणे फेडताना वर्षाला ३.५ कोटी पौंड देऊ असे ब्रिटनने कबूल करूनही ही रक्कम फार मोठी होते अशी तक्रार केली होती.[६] जर्मनीप्रमाणे ब्रिटनचा प्रदेश गमावला गेला नव्हता व त्यावर पराभूताप्रमाणे भय व दडपण आलेले नव्हते. तेव्हा या आकड्यांशी तुलना करता पहिल्या महायुद्धाचा खर्च वसूल करण्याची ईप्सा केवढी भयानक होती हे लक्षात यावे.

जर्मनीची आर्थिक पुनर्रचना करण्याचा प्रश्न मोठा होता व खंडणीची वसुली त्याच्या आड येत होती. उलट प्रत्यक्षात या अटी इतक्या सैल केल्या गेल्या आणि खंडणीपेक्षा इतके जास्ती कर्ज अमेरिकेकडून जर्मनीला दिले गेले की, त्यातून त्वेषाने जर्मनीने पुनः आपले सैन्य व शस्त्रागार सुसज्ज केले. हिटलर व दुसरे महायुद्ध यातून उद्भवले. फ्रेंचांनी केन्सने सुचविल्याप्रमाणे मनाचा मोठेपणा दाखविला असता तर! दुसरे महायुद्ध "अनावश्यक" होते असे विन्स्टन चर्चिलने नमूद केले आहे.[७]

पण हिटलरच्या नेतृत्वाखाली जर्मनीचे पुनरुत्थान व्हावयाचे होते व दुसऱ्या महायुद्धाच्या खाईत सगळा यूरोप धोक्यात यावयाचा होता. प्रबळ राष्ट्रांच्या प्रमत्त स्पर्धेने "शीत युद्धाचा" खेळ सुरू होणार होता. मानवजातीचा विनाश की मानवी संस्कृतीचा उदय यांची ओली-सुकी व्हावयाची होती.

### पैशासंबंधीचा निबंध (ए ट्रीटीज ऑन मनी)

दोन महायुद्धांच्या काळात केन्सची गाजलेली पुस्तके म्हणजे द्विखंडात्मक 'पैशासंबंधीचा निबंध' व क्रांतिकारी 'जनरल थिअरी' किंवा 'सर्वसाधारण सिद्धांत...' ही होत. यांतील 'पैशासंबंधीच्या निबंधा'ची चर्चा या भागात करू.

"पैशासंबंधीच्या निबंधाच्या" पहिल्या खंडाचा पैशाचा सिद्धांत हा विषय आहे तर दुसऱ्या खंडात त्या सिद्धांताचा उपयोजित व्यवहार चर्चिला गेला आहे.

"पैशाचा सिद्धान्त" या ग्रंथात त्याने एक समीकरण मांडले. त्या समीकरणाचा अर्थ सांगावयाचा तर असा :






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समग्र उत्पादनाच्या किमतीची पातळी =

मानवी प्रयत्नांच्या प्रत्येक परिमाणापासून मिळणारा प्राप्तीचा दर / कार्यक्षमतेचा गुणांक

+ नव्या भांडवली मालातील वाढीचे मूल्य – बचत / एकूण वस्तूंचे उत्पादन

या समीकरणातून किमतींची पातळी प्रत्यक्ष पैशाच्या पुंजीवरून ठरत नाही हे केन्सला दाखवायचे आहे. या आधी श्रम व माल यांचे भावमान हे पैशाची पुंजी व त्याच्या संचारणाचा वेग यांच्या समान असते ( भावमान = पैसासंचार ) असे मानले जात होते. पैशाची पुंजी वाढली की वस्तुश्रमांचे भावमान तत्काल वाढते असे समजले जाई. तेव्हा भाव घसरण्यावर ( मंदीवर ) उपाय म्हणजे पैशाची पुंजी वाढवणे हा आहे, असे अनुमान निघे. पण १९३० च्या जागतिक मंदीने हा सिद्धान्त खोटा ठरवला. किमतीच्या पातळीचा आणि पैशाच्या पुंजीचा इतका प्रत्यक्ष संबंध नाही हे स्पष्ट झाले. केन्सला "पैशासंबंधीच्या निबंधात" हेच दाखवून द्यावयाचे होते.

केन्सच्या वरील मूलभूत समीकरणात पैशाच्या पुंजीचा प्रत्यक्ष संबंध कुठेच आढळत नाही. याचा अर्थ असा आहे, की पैशाच्या पुरवठ्याचा किमतीच्या पातळीवर कोणताच परिणाम होत नाही. हा परिणाम अप्रत्यक्षपणे व वरील समीकरणातील घटकांच्या द्वाराच होणारा आहे असे केन्सला वाटत होते. अर्थव्यवस्थेतील पैशाचे महत्त्व केन्सने ओळखले होते. आणि म्हणूनच पैशाच्या व्यवस्थेत सुधारणा घडवून आणण्यासाठी केन्सने सतत प्रयत्न केला.

केन्सच्या या मूलभूत समीकरणात भावमानाचा आणि मजुरीच्या दराचा व मजुराच्या कार्यक्षमतेचा संबंध दाखविलेला आहे. म्हणून कार्यक्षमतेच्या प्रमाणाहून मजुरीचे दर वाढल्यास भाववृद्धी येते, हे यातून ध्वनित होते. उत्पादनखर्चजन्य भाववृद्धीच्या आजच्या विवेचनाशी याचा संबंध येतो. तसेच संचयापेक्षा नवीन गुंतवणूक वाढली, तर भाववृद्धी व संचयापेक्षा नवीन गुंतवणूक कमी झाली तर भाव-घट ( थोडक्यात, तेजीमंदीचे व्यापारी कालचक्र ) येत राहते असे यात स्पष्ट होते.

केन्स म्हटला की त्याचा "सर्वसाधारण सिद्धान्त" आपल्या नजरेसमोर येतो. पण "सर्वसाधारण सिद्धान्त" म्हणजे पूर्ण केन्स नव्हे. "सर्वसाधारण सिद्धान्तात" केन्सचा "निबंध" सुप्तपणे वावरत आहे. यामुळे पैशासंबंधीचा सिद्धान्त व व्यवहार यांचा अभ्यास करावयाचा झाल्यास आपल्याला 'निबंधा'-कडेच वळावयास हवे. याचसाठी "निबंधाचे" 'पुनरुज्जीवन' व्हावे असे रॉय हॅरड व जॉन हिक्स यांना वाटते.

"सर्वसाधारण सिद्धान्त" हा पुढचा विकास आहे. अधिक व्यापक आहे. वेगळा नव्हे. तो तसा निराळा आहे अशी एक चुकीची समजून प्रसृत आहे. याची दोन कारणे संभवतात. एक असे की 'सर्वसाधारण सिद्धान्ता'त बचत आणि गुंतवणूक यांची समानता दाखविलेली असून निबंधात त्यात तफावत पडून व्यापारी कालचक्र येते असे प्रतिपादले आहे. केन्सची ही कोलांटी उडी समजली जाते. पण हा फरक या ग्रंथातील बचत आणि गुंतवणूक या संज्ञांच्या भिन्न व्याख्येमुळे आलेला आहे. आधीची व्याख्यादेखील या दोन्ही ग्रंथांत वेगवेगळी आहे. समाजाच्या अर्थव्यवहाराच्या हिशेबातील आज सर्वमान्य ठरलेल्या प्राप्ती, बचत, गुंतवणूक यांच्या व्याख्या "सर्वसाधारण सिद्धान्तात" आढळतात. तर यातील काही भाग "निबंधातील" समीकरणातून वगळलेला आहे. प्राप्तीच्या अशा खास व्याख्येमुळेच "निबंधातील" बचत आणि गुंतवणूक यांच्यांत तफावत पडते. तसेच "सर्वसाधारण सिद्धान्तातील" व्याख्या या वस्तुगत परिमाणात ( मजुरीमानात ) मांडलेल्या आहेत. तर "निबंधात" त्या पैशाच्या परिमाणात मांडलेल्या आहेत. त्यामुळेही फरक उद्भवतो. दुसरे कारण असे दिसते, की "सर्वसाधारण सिद्धान्तात" पैशासंबंधीच्या निबंधातील मूलभूत समीकरणांचा मागमूस लागत नाही. म्हणून या दोन ग्रंथांत भिन्नता मानली जात असावी. परंतु "सर्वसाधारण सिद्धान्तातील" काही ठिकाणच्या विवेचनांत केन्सच्या मनात ही मूलभूत समीकरणे आहेत असे दाखविता येते. तेव्हा "सर्वसाधारण सिद्धान्त" हा "पैशासंबंधीच्या निबंधाचा" पुढचा विकास आहे. या दोन ग्रंथांतील विवेचनांत आढळणारा फरक हा संज्ञांच्या व्याख्ये-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तील फरकामुळे आलेला आहे. त्या केन्सने मारलेल्या कोलांटचा उडचा नव्हेत.

"पैशासंबंधीचा निबंध" व "सर्वसाधारण सिद्धान्त" यांतील संबंध कसा आहे हे खुद्द केन्सने "सर्वसाधारण सिद्धान्ताच्या" प्रस्तावनेत स्पष्ट केले आहे :

"'पैशासंबंधीचा निबंध' लिहायला घेतला तेव्हा मी परंपरागत चाकोरीत वावरत होतो. पैशाचा प्रभाव हा मागणी-पुरवठ्याच्या सर्वसाधारण सिद्धान्ताहून निराळा आहे असे मी समजत होतो. तो ग्रंथ लिहून संपवला तेव्हा मी थोडी प्रगती केली व पैशाचा सिद्धान्त हा एकंदरीने उत्पादनाच्या सिद्धान्ताचा घटक राहील असे पाहिले. परंतु पूर्वग्रहित कल्पनांपासून माझी पुरती सुटका न झाल्याने उत्पादनाच्या पातळीत होणाऱ्या बदलांच्या परिणामांची पूर्ण दखल घेण्यास मी अयशस्वी ठरलो. पैशासंबंधीच्या निबंधातील तात्त्विक भागात (विशेषतः त्याच्या तिसऱ्या व चौथ्या भागात) ही मोठी चूक राहिली असे आज मला वाटते. माझी तथाकथित 'मूलभूत समीकरणे' म्हणजे ठराविक उत्पादन गृहीत धरून काढलेले तत्क्षणीय चित्र होते. अशा तत्क्षणिक चित्राहून वेगळी असणारी गतिमान वाढ ही तिथे अपुरी व अतिशय गोंधळवून सोडणाऱ्या अवस्थेत राहिली होती. उलट "सर्वसाधारण सिद्धांतात" उत्पादन व रोजगार यांच्या पातळीत एकंदरीने कोणत्या गोष्टींमुळे बदल होतात यांचाच मुख्यतः अभ्यास आहे. आणि आर्थिक व्यवस्थेत पैसा एका आवश्यक आणि विशिष्ट पद्धतीने शिरकाव करतो हे दाखवून देत असताना पैशासंबंधीचा तांत्रिक तपशील बाजूला सारला आहे."

## युद्धाचा खर्च कसा भागवावा ?

पहिल्या महायुद्धाप्रमाणेच दुसऱ्या महायुद्धातही केन्सला सहभागी व्हावे लागले. पण या खेपेस सनदी नोकर न राहता आर्थिक धोरण ठरविण्यातील सल्लागार अर्थतज्ज्ञ म्हणून त्याला नेमण्यात आले.

२५ ऑगस्ट १९३९ ला युद्धास तोंड फुटले व साहजिकच युद्धाच्या खर्चाकडे केन्सचे लक्ष गुंतले. फब्रुवारी १९४० त "युद्धाचा खर्च कसा भागवावा" हे त्याचे पुस्तक बाहेर पडले. यातील मुख्य मुद्दा हा होता, की शांतता काळातील व्यवस्थेला युद्धकार्यासाठी कसे वळवावे आणि युद्धविषयीची वस्तू व तसेच श्रम कसे मिळवावेत. खासगी नवी गुंतवणूक तर कमी व्हावीच; पण मुख्यतः लोकांचा उपभोगावरील खर्च कमी व्हायला हवा. हे चार प्रकारे होऊ शकेल :

(१) व्यक्तींनीच आपला उपभोग कमी करावा वबचत सरकारी रोख्यांत गुंतवावी. ही व्यक्तीतर्फे खुषीची बचत होय. अशी बचत विशेषतः मजूर वर्गाने करावी. याला नंतर "लांबणीवर टाकलेल्या पगाराचे" (मजुरीचे) स्वरूप मिळाले. हीच गोष्ट कर लादून साधता येईल. परंतु असे कर लादण्यावर मजुरांच्या राजकीय विरोधामुळे मर्यादा पडतात.

पगार स्वीकृती लांबणीवर टाकल्यामुळे मुलांचे हाल होऊ होऊ नयेत म्हणून प्रत्येक मुलामागे ५ शिलिंग भत्ता द्यावा अशी केन्सची एक सूचना होती. पण ती युद्धसमाप्तीनंतरच स्वीकारली गेली.

(२) उपभोग्य वस्तूंचे रेशनिंग करून उपभोग सक्तीने कमी करता येईल. एवढेच नव्हे तर ज्या उपभोग्य वस्तूंची टंचाई आहे तिचे सर्वांना सारखे वाटप होऊ शकेल. रेशनिंगची व वाटपाची यंत्रणा सुलभ व सुसज्ज असावयास हवी.

(३) चलनवाढ. सरकारी रोखे केंद्रबँकेला विकून त्यांच्या तारणावर केंद्रबँकेने चलनवाढ करावी. अशा रीतीने सरकारच्या हाती क्रयशक्ती येऊन खासगी व्यवहाराकडे वळणाऱ्या वस्तू आणि श्रम युद्धकार्यास जुंपता येतील.

(४) बचत वाढण्यास प्रेरणा द्यायची तर व्याजाचा दर वाढावयास हवा. परंतु वाढीव दरामुळे सरकारी तिजोरीवर जास्ती ताण पडतो. दर वाढवून बचत गोळा होईपर्यंत वेळ लागतो, तरी तेवढी बचत उपलब्ध होण्याची खात्री नसते व हे दिरंगाईचे ठरते. उलट सरकारी रोखे विक्रीस काढल्याने व्याजाचा दर कमी राहतो. असे हे स्वस्त पैशाचे धोरण ठरते. अशा धोरणामुळे ब्रिटनमध्ये दुसऱ्या महायुद्धाच्या काळात व्याजाचा दर तीन टक्के राहिला. पहिल्या महायुद्धाच्या काळात हा दर पाच टक्के होता. तसेच १९१९ च्या मानाने

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

१९४५ त सरकारी कर्जाची रक्कम तिपटीने वाढली तरी व्याजाचा दर फक्त ५६ टक्क्यानेच जास्त होता.[८]

( ५ ) वाढते कर. भाववृद्धी टाळायची तर चलनवाढीबरोबर वस्तू आणि श्रमांचा उपभोग कमी व्हावयास हवा व त्यासाठी वाढत्या करांच्या रूपाने लोकांनी त्याग करायला हवा.

" युद्धाचा खर्च कसा भागवावा ? " या पुस्तकाच्या मागून लगेच " राष्ट्रीय साधनसंपत्तीचे अंदाजपत्रक " हा एक लेख खासगी वितरणासाठी केन्सने तयार केला. यातून पुढे " राष्ट्रीय प्राप्तीचे हिशेब " प्रसिद्ध करण्याची सरकारी यंत्रणा व व्यवस्था आकाराला आली. समग्र हिशेब तयार करून त्याचे विश्लेषण करण्याच्या आजच्या पद्धतीचे मूळ श्रेय केन्सला दिले जाते.

परदेशी गुंतवणुकीच्या तारणावर किंवा परदेशातील गुंतवणुकी अमेरिकनांना विकून अमेरिकन डॉलर मिळविण्याची केन्सची एक सूचना होती. परंतु ती फलद्रूप झाली नाही.

## आंतरराष्ट्रीय नाणेनिधीसाठी प्रयत्न

पहिल्या महायुद्धानंतर आलेल्या अनुभवांची पुनरावृत्ती होणार नाही याकडे लक्ष पुरवणे आता आवश्यक होते. म्हणजे

१. युद्धानंतर आंतरराष्ट्रीय चलनव्यवस्था व विनिमय कसा असावा,
२. वस्तू व श्रमांचा विनिमय, जकात, आयातीवरील बंधने, (ब्रिटनच्या बाबतीत) राष्ट्रकुलाचे राष्ट्रकुलाबाहेरील देशांशी व्यापारी संबंध व संरक्षण इत्यादींचे धोरण कोणते असावे,
३. परदेशी व्यवहारांचे स्वदेशी रोजगारावर, किंमतीवर व व्यापारावर होणारे घातक परिणाम कसे टाळावेत,
४ युद्धोत्तर यूरोपची पुनर्रचना कशी करावी, इत्यादी प्रश्नांबद्दलची धोरणे निश्चित करणे जरुरीचे होते.

पहिल्या जागतिक युद्धानंतर जशी सर्वत्र मंदी व बेकारी आली, तशी दुसऱ्या महायुद्धानंतरही येईल अशी सर्वत्र अटकळ होती. बेकारी ही अनिवार्य असते हा विचार केन्सच्या रोजगाराच्या सिद्धांताने बाजूला पडलेला होता. उलट पूर्ण रोजगाराचे बुद्धिपुरस्सर धोरण आखले पाहिजे हे ब्रिटिशांनी मान्य केलेले होते. युद्धानंतर सुवर्णमानकाचा स्वीकार करायला पहिल्या महायुद्धानंतरच्या अनुभवामुळे ब्रिटन तयार नव्हते. याचा विचार आंतरराष्ट्रीय चलनव्यवस्था ठरविताना करणे अपरिहार्य होते. पहिल्या जागतिक युद्धानंतर अमेरिका हे सधन राष्ट्र म्हणुन उदयास आले होते. १९२०–३३ च्या काळात जगातील सोन्याचा बहुतेक साठा अमेरिकेकडे गेलेला होता व तो आता दुसऱ्या महायुद्धानंतर वाढता राहणार हे उघड होते. तेव्हा अमेरिकेशी सहकार्य केल्याशिवाय नव्या युद्धोत्तर जगाची पुनर्रचना अशक्य होती. किंबहुना सगळ्या राष्ट्रांसाठी एक चलन–व्यवहार–समायोजन–संस्था निर्माण करणे व त्यासाठी सगळ्यांचाच सहकार साधणे अपरिहार्य होते. ब्रिटिश वित्तमंत्रालयाने " चलन–व्यवहार–समायोजन संघटना " यासंबंधीची एक योजना तयार केली. ती व्यक्तिशः केन्सची योजना नसली तरी वित्तमंत्रालयाचा सल्लागार म्हणून केन्सचा त्यात फार मोठा वाटा आहे. या योजनेचा उद्देश केन्सच्या शब्दांत सांगायचे तर, " एका देशात माल विकून येणाऱ्या पैशाचा उपयोग दुसऱ्या देशातील माल खरेदी करावयास करणे " हा होता. या संघटनेने वापरावयाच्या चलनास " बँकर " असे नाव दिले होते व त्याचे मूल्य सोन्यात निश्चित करावयाचे होते. निर्याताधिक्याने एखाद्या देशाची निव्वळ येणेबाकी वाढली तर त्या देशाच्या नावाने बँकर जमा करावे लागतील तर आयाताधिक्याने देणेबाकी असलेल्या देशास बँकरचे कर्ज द्यावे लागेल. बँकर हे आंतरचलन बनावे अशी कल्पना होती. ठेव म्हणून सोने देऊन बँकर मिळवता यावयाचे होते. पण या संघटनेतील राष्ट्रांबाहेर " बँकर "चा व्यवहार जावयाचा नव्हता.

अमेरिकेने संयुक्त व सहयोगी राष्ट्रांसाठी स्थिरतानिधीची योजना मांडली. यात प्रत्येक राष्ट्राने ठराविक प्रमाणात सोने, डॉलर्स व स्वतःच्या देशाचे चलन या निधीसाठी द्यावयाचे होते व या निधीतर्फे त्याची खरेदी-विक्री व्हावयाची होती. या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

योजनेला युनिटास योजना नाव दिल्यास युनिटास हे बँकरप्रमाणे आंतरराष्ट्रीय विनिमय-माध्यम व्हावयाचे नव्हते.

या योजना १९४३ त पुढे आल्या. पण "मुक्त" व्यवस्थेचा पगडा अमेरिकेत इतका होता, की या दोन्ही योजना म्हणजे, "देणे फेडण्याची ताकद नसतानाही राष्ट्रांना माल खरेदी करणे शक्य कर-करणाऱ्या व म्हणून धोकादायक" असें त्यांचे वर्णन केले गेले.[९]

या दोन योजनांच्या आधारावर पुढे ब्रेटनवुडस् येथे वाटाघाटी, टीका, सुधारणा व तडजोडी होऊन "आंतरराष्ट्रीय नाणे-निधी" व "पुनर्रचना व विकास यासाठी आंतरराष्ट्रीय बँक" या आंतरराष्ट्रीय संस्थांचा जन्म झालेला आहे. त्यांच्या कायदेशीर घटनेची इथे चर्चा करावयाची आवश्यकता नाही. पण ब्रिटिश-प्रतिनिधी म्हणून केन्सचा यात प्रेरक सहभाग होता हे लक्षात ठेवावयास हवे.

ब्रेटनवुडस् येथे जुलै १९४४ त भरलेल्या जागतिक परिषदेस भारताचा प्रतिनिधी गेलेला होता. त्यावेळी युद्धकाळात ब्रिटनसाठी भारताने (ईजिप्तनेदेखील) केलेल्या खर्चामुळे भारताची अतिशय मोठी रक्कम स्टर्लिंग गंगाजळीत जमा होती. या रकमेचा भारताला आपल्या विकासासाठी लागणारा भांडवली माल कोणत्याही इतर देशात खरेदी करण्यास उपयोग करू द्यावा अशी भारताने सूचना केली. ब्रिटन स्टर्लिंग गंगाजळी परत न देता बुडवेल की काय अशी भीती या सूचनेमागे होती. कारण ब्रिटनमधील त्यावेळच्या सत्ताधारी गटाचे हा पैसा त्या त्या राष्ट्रांच्या संरक्षणासाठी खर्च झाल्याने त्यांना ही गंगाजळी परत मागण्याचा अधिकार नाही असे मत होते.[१०] परंतु या सूचनेला केन्सने असे उत्तर दिले की, "या कर्जांच्या फेडीचा प्रश्न त्या त्या देशातील अंतर्गत प्रश्न असून परस्पर वाटाघाटींनी तो सोडविला पाहिजे. युद्धातला कर्जबाजारीपणा घालविण्यासाठी या निधीचा प्रत्यक्ष वापर करता यावयाचा नाही." अमेरिकेचेही असेच मत पडल्याने स्टर्लिंग गंगाजळी फेडण्याचे कोणतेही कलम निधीच्या घटनेत समाविष्ट केले गेले नाही. केन्सचा व भारताचा पुनः संबंध कुठे आला हे जाताजाता नमूद करावे एवढाच इथे उद्देश आहे. एकंदर जगाच्या दृष्टीने निधी–संस्था उभी करताना कर्जफेडीला स्थायी महत्त्व नाही.

या तडजोडी करताना केन्सला बराच मानसिक व शारीरिक त्रास सोसावा लागला. यामुळे त्याला हृदयविकाराचा झटका येऊन त्याचा २१ एप्रिल १९४६ रोजी अंत झाला. रसेलच्या मते केन्सला अतिश्रम करायची नेहमीचीच सवय होती व अतिश्रमानेच त्याला मृत्यू आला. केन्सबद्दलचे आपले मत रसेलने पुढीलप्रमाणे नमूद करून ठेवले आहे :

"केन्सची बुद्धिमत्ता अतिशय तीक्ष्ण व स्पष्ट होती...इतकी हुषारी उथळ असते अशी मी पूर्वी कल्पना करीत असे. परंतु केन्सकडे पाहिल्यास या कल्पनेत काही तथ्य नाही हे स्पष्ट दिसते."[११]

## "रोजगार व्याज व पैसा यासंबंधीचे सर्वसाधारण सिद्धान्त"

(जनरल थिअरी ऑफ एंप्लॉयमेंट, इंटरेस्ट अँड मनी)

याचा उल्लेख संक्षेपाने "सर्वसाधारण सिद्धान्त" असा केला जातो. 'सर्वसाधारण सिद्धान्त' हा केन्सचा ग्रंथ क्रांतिकारक ग्रंथ ठरला आहे. क्रांती ही सापेक्ष असते आणि म्हणून केन्सच्या आधी रूढ झालेल्या अभिजात अर्थशास्त्राचे विवेचन करावयास हवे. ते इथल्या मर्यादेबाहेरचे आहे. ही चर्चा केन्सवरील माझ्या लेखात आलेली आहे. म्हणून इथे फक्त काही मुद्दे वाचकांच्या नजरेस आणून देऊन मी समाधान इच्छितो.

१. पूर्ण रोजगाराहून कमी रोजगार असतानादेखील अर्थव्यवस्था समतोल राहू शकते. म्हणजे पूर्ण रोजगाराकडे जाण्याचा अर्थव्यवस्थेचा जो आपोआप कल गृहीत आहे तो चुकीचा आहे; सगळी बेकारी खुशीची नसून सक्तीची, किंवा नाखुशीची असू शकते.

२. मजुरी लवचीक राखल्याने, तीत तूट मान्य केल्याने बेकारी नाहीशी होऊ शकते ही धोरणविषयक सूचना चुकीची असून उलट तूट मान्य केल्यास प्रभावी मागणी कमी होऊन बेकारी वाढण्याचीच शक्यता जास्त.

३. एकीकडे पैशाचा सिद्धान्त व दुसरीकडे उत्पादन व मूल्य सिद्धान्त यांची जी फारकत होती ती








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राखून त्यांचा समन्वय साधण्याचा केन्सने प्रयत्न केला. परंतु हा समन्वय अद्याप पूर्ण साधला गेलेला नाही. प्राप्ति-विनियोग सिद्धान्त, सर्वसाधारण समतोलपणाचा सिद्धान्त, आणि अलीकडे उदय झालेला ( पैशाचा ) पूंजी–सिद्धान्त असे अलग विभाग अजून दिसून येतात. भाववृद्धीच्या विवेचनात तेवढी या सगळ्यांची सांगड दिसून येते.

४. भाण्डवल उत्पादक आहे म्हणून नफा मिळत नसून ते तुलनेने दुर्मिळ बनले आहे म्हणून आज नफा मिळतो. भांडवलदार आज फक्त " खंड-धारक " बनलेले आहेत.

५. बचतीमुळे उपभोग व म्हणून समग्र प्रभावी मागणी कमी होते. बचत ही सरळ व अपरिहार्यपणे गंतवली जात नाही. बचत करण्याचे व गुंतवणूक करण्याचे निर्णय हे वेगवेगळे आहेत. त्यामुळे बचत वाढावी म्हणून व्याजाचा दर चढा ठेवण्याचे आणि विषमता राखण्याचे काही कारण नाही.

६. उलट भांडवलाची सीमागत उत्पादनशक्ती, त्याचा साठा वाढेल तशी, कमी कमी होत जाणारी असल्याने गुंतवणूक वाढविण्यासाठी व्याजाचा दर कमी राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे. दीर्घमुदतीचा व्याजाचा दर कमी राखण्यावर केन्सने सतत भर दिलेला आहे. उत्पादन व रोजगार यांच्या स्थितिसापेक्ष बचत हा ' गुण ' वा दोष ठरू शकतो.

७. अर्थविज्ञानात ' काळ ' व ' अपेक्षा ' यांना केन्सने स्थान दिले. ' समतोलपणा ' ' पूर्ण दूर-दृष्टी ' व ' संपूर्ण ज्ञान ' यासंबंधीच्या गृहीत-कात मोहून पडलेल्या अर्थविज्ञानाला केन्सने जागे केले.

८. व्याजाचा दर बचतगुंतवणुकीच्या मागणी-पुरवठ्याने नव्हे तर रोकडपसंती व पैशाचा पुरवठा यातून ठरतो.
केन्सचा हा सिद्धान्त पूर्णपणे मान्य झालेला नाही. काटकसर व उत्पादकता यांपासून त्याची फारकत झालेली आहे. अर्थात पूर्णपणे समाधानकारक असा व्याजाच्या दराचा सिद्धान्त अद्याप साकारावयाचा आहे.

९. गुंतवणुकीचे सामाजीकरण करण्यात, पूर्ण रोजगाराचे बुद्धिपुरस्सर धोरण सरकारने स्वीकारायला लावण्यात, केन्सपासूनच प्रेरणा मिळाली. प्राप्तीच्या धोरणास म्हणजे मजुरी व नफा यांच्यावर नियंत्रण ठेवण्याच्या धोरणास केन्सने विरोध केला नसता.

१०. मानवी मूल्यांपासून अर्थशास्त्राची फारकत करणे शक्य नसल्याने अर्थशास्त्राला एकांगी वा उथळ न बनवता पुनः पारंपरिक राज्य–अर्थशास्त्राचा दर्जा मिळवून दिला.

आता " सर्वसाधारण सिद्धान्ता"तील काही उणिवा अशा :

१. ' सर्वसाधारण सिद्धान्त ' हा प्रवाहासंबंधी ( flow ) आहे. साठ्यासंबंधी ( stock ) नाही. साठा होत जात असताना होणाऱ्या परिणामांचे त्यात विवेचन नाही. ' भांडवलाच्या सिद्धान्ताचा ' त्यात अभाव आहे.

२. व्याजाचा दर, व्यापारी कालचक्र, यासंबंधीचे त्याचे विवेचन अपूर्ण आहे. गुणक–प्रवेग तत्त्वांचा, विकासाचा व कालचक्राचा त्यात संबंध दाखविलेला नाही.

३. उपभोगप्रवृत्तीचे संपूर्ण विवेचन त्यात आढळत नाही. उपभोग प्रवृत्ती केन्सने गृहीत धरल्या-प्रमाणे स्थिर नाही. तसेच उपभोगप्रवृत्तीवर वाढत्या संपत्तीच्या होणाऱ्या परिणामांचे त्याचे विवेचन ढोबळ आहे.

४. उत्पादकतेकडे केन्सने दुर्लक्ष केले ( किंवा गृहीत धरले). त्यामुळे (शीत) युद्धाची तयारी करीत पूर्ण रोजगार न राखता, मानवाच्या कल्याणासाठी उत्पादन वळवून त्यातून पूर्ण रोजगार ( व फुरसतदेखील) मिळाली पाहिजे हा विचार दृष्टिआड झाला.

५. विभाजनाचा सिद्धान्त बाजूला पडला. त्यामुळे पूर्ण किंवा पूर्णवत् रोजगार प्रस्थापित झाल्या-वर मजुरांचा वाटा वाढतो, त्यांच्या अपेक्षा वाढून प्रभावी मागणीत सतत वाढ होत जाते. वाढत्या गुंतवणुकीने व उपभोगावरील वाढत्या विनियोगाने साधन संपत्तीवर ताण पडतो व त्यातून ( मागणीने खेचली जाणारी व खर्च-वाढीने ढकलली जाणारी ) भाववृद्धी सतत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जोपासली जाते. भाववृद्धीचे तणाव आपल्याला सतत सोसावे लागतील याची, दुसऱ्या महायुद्धापूर्वी केन्सला व तशीच इतर कुणाला कल्पना आली नाही.

६. सर्वसाधारण सिद्धान्त हा "सर्वसाधारण" नसून सर्वसाधारण समतोल सिद्धान्ताचा तो एक भाग आहे.

## सर्वसाधारण सिद्धान्तावरील प्रतिक्रिया

'सर्वसाधारण सिद्धांताचा' प्रभाव सर्वत्र, विशेषतः अमेरिकेत, तत्काळ पडला. इतका की, युद्धोत्तर जगाच्या भवितव्याविषयी चर्चा करण्यास केन्स जेव्हा १९४४ त वॉशिंग्टनला गेला तेव्हा, "त्यात मी एकटाच तेवढा न-केन्शियन होतो," असे उद्‌गार त्याने काढले आहेत.[१२]

'सर्वसाधारण सिद्धांता'बद्दल तीव्र प्रतिक्रियाही व्यक्त झाल्या आहेत. पहिली प्रतिक्रिया त्यातील भाषेसंबंधी आहे. 'सर्वसाधारण सिद्धांतातील' भाषा काहीशी क्लिष्ट झालेली आहे. इतकी की, कित्येकदा तो ग्रंथ पूर्ण वाचलाही जात नाही. मुळात ग्रंथ न वाचताच, त्यावरील मीमांसा, टीका वाचून सामान्यपणे केन्सचा सिद्धांत समजावून घेतला जातो. त्याच्या या क्लिष्टतेमुळे सुलभ, ओघवत्या व शैलीदार भाषेत लिहिण्याची केन्सची तेथवर जी ख्याती होती ती पार नाहीशी झाली. "वाईट तऱ्हेने लिहिलेले पुस्तक" अशी त्याची प्रोफेसर सॅम्युअलसन संभावना करतात. तर शुम्पीटर म्हणतो की, "शांततेचे आर्थिक परिणाम" (१९१९) यासारखे लेखन केन्सच्या हातून पुनः व्हायचे नव्हते.

दुसरी प्रतिक्रिया अशी आहे, की 'सर्वसाधारण सिद्धांताची' भाषा, निदान काही ठिकाणी, संदिग्ध आहे. काही संज्ञांचा व विवेचनाचा केन्सला कोणता अर्थ अभिप्रेत होता याबद्दल वेगवेगळी भाष्ये संभवली आहेत. 'पैशासंबंधीचा निबंध' त्याच्या तीस वर्षांच्या सखोल अभ्यासानंतर, पैशाच्या व्यवहारांच्या सूक्ष्म निरीक्षणानंतर व प्रत्यक्ष अनुभवावर आधारून लिहिलेला होता, तर 'सर्वसाधारण सिद्धांत' घाईने व त्यामागील सैद्धान्तिक संश्लेषण कित्येकदा अव्यक्त ठेवून लिहिलेला आहे. यामुळेही ही संदिग्धता निर्माण झालेली आहे. सर्व तऱ्हेने निर्दोष सिद्धांताचे प्रतिमान निर्माण करीत राहण्यापेक्षा त्यातून उद्भवणारे धोरण समजावून देण्याची, ते स्वीकारायला लावायची केन्सला घाई होती. हे धोरण व्यक्त करण्यासाठी ज्या सिद्धांताची (त्यामागील गृहीतकृत्ये स्पष्ट न करता) तत्काळ आवश्यकता होती तेवढी लगोलग मांडण्याची त्याला तत्परता होती. त्याने म्हटल्याप्रमाणे :

"ज्या विशिष्ट पद्धतीने मी माझे विचार मांडलेले आहेत त्या पद्धतीपेक्षा, माझ्या सिद्धांतातील तुलनेने साध्या, मूलभूत कल्पनांना मी अधिक चिकटून आहे ... या सोप्या, मूलभूत कल्पना रुळल्या, व मान्य झाल्या तर काळ, अनुभव, व अनेक विद्वानांचा सहयोग यांतून त्या व्यक्तविण्याची पद्धत शोधली जाईल."

'सर्वसाधारण सिद्धान्त' लिहिताना प्रस्थापित सिद्धान्तातील विचार व अभिव्यक्ती यांच्या पकडीतून सुटका करून घेण्यासाठी त्याला सतत झगडावे लागले. यामुळेही त्यात संदिग्धता आली असावी. तसे पाहिल्यास प्रस्थापित धाटणी झिडकारून नवीन संकल्पना व विचार मांडताना काहीशी क्लिष्टता येणे अपरिहार्य दिसते. नवीन संकल्पना मान्य झाल्यावर सोप्या रीतीने व्यक्तविण्याचा शोध घेतला जातो.

'सर्वसाधारण सिद्धान्ता' संबंधीची तिसरी प्रतिक्रिया त्यातील सिद्धान्तासंबंधी आहे. 'सर्वसाधारण सिद्धान्ता'चा दोन तऱ्हेचे विचार करता येतो. प्राप्ती व रोजगार ठरविणाऱ्या प्रभावी मागणीचा सिद्धान्त म्हणून त्याची चर्चा करता येते व इथे पैशाच्या सिद्धान्ताला गौण स्थान देता येते. पण त्यात पैशाच्या सिद्धान्ताचाही विचार येतो व मत्ता बाळगताना इतर मत्तेला पैसा एक पर्याय आहे हा विचार प्रमुख ठरतो. प्रभावी मागणीची चर्चा करताना उपभोगप्रवृत्ती या संकल्पनेची चर्चा महत्त्वाची ठरते, तर पैशाच्या सिद्धान्ताच्या संबंधात त्याची रोकडप्रवृत्तीची चर्चा महत्त्वाची ठरते. 'सर्वसाधारण सिद्धान्तात' व्याजाच्या दरासंबंधीही विवेचन आहे. पण ते संदिग्ध, अपुरे व अनिर्णायक आहे असे म्हटले जाते. 'पैशासंबंधीच्या निबंधात' चर्चिलेले व्याजाच्या 'स्वाभाविक' दराचे विवेचन 'सिद्धान्तात' अभावानेच आढळते व व्याजाचा दर तिथे पैशाची मागणी व पुरवठा ठरविणारा

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

दर ठरतो. पण सैद्धान्तिक मीमांसेच्या दृष्टीने या दोन्हींची सांगड घालावी लागते या गोष्टीचे महत्त्व केन्सने उडवून लावलेले दिसते.

चौथी प्रतिक्रिया त्यातील परिमाणासंबंधी आहे. 'सर्वसाधारण सिद्धान्तातील' प्राप्ती, गुंतवणूक, बचत या संज्ञा मजुरी-परिमाणात व्यक्तविलेल्या आहेत. अभिजात विचाराप्रमाणे मजुरीपरिमाण एकजिनसी असते असे तर यात गृहीत आहेच; पण शिवाय इतर किंमतींच्या मानाने मजुरी स्थिर अत एव 'चिवट' असते असेही गृहीत आहे. ही दोन्ही गृहीतके चुकीची ठरलेली आहेत. मजुरीतील 'चिवटपणा' नाहीसा होण्याचे प्रमुख कारण असे आहे, की दुसऱ्या महायुद्धानंतर समाजाच्या उद्दिष्टातच बदल झालेला आहे. पूर्वी किंमतींच्या स्थिरतेला महत्त्व होते व त्यासाठी (वाढत्या) बेकारीच्या रूपाने किंमत दिली जाई. पण आता पूर्ण रोजगाराचे उद्दिष्ट साध्य करण्याला (केन्सच्या प्रभावामुळे) राजकीय प्राधान्य लाभल्यामुळे स्थिरतेचे व म्हणून मजुरीच्या चिवटपणाचे गृहीतक अयोग्य ठरलेले आहे.

पाचवी प्रतिक्रिया, आज भेडसावणाऱ्या प्रश्नांचे विवेचन केन्सच्या 'सर्वसाधारण सिद्धान्तात' आधीच आलेले आहे हे दाखविण्याची आहे. तर याउलट 'सर्वसाधारण सिद्धान्त' कसा व कुठे तोकडा आहे हे दाखविण्याची अहमहमिका आढळते. केन्सने प्रभावी मागणीचे अर्थशास्त्र मांडले ते बंदिस्त अर्थव्यवस्थेचे अर्थशास्त्र आहे. उपलब्ध मजुरांचे अस्तित्वातील कौशल्य व संख्या, उपलब्ध यंत्रसामग्रीचे गुणमान व संख्यामान, अस्तित्वातील तंत्र, स्पर्धेचा दर्जा, उपभोक्त्यांच्या आवडी व सवयी, श्रमाच्या विभिन्न सघनतेची अनुपयुक्तता, देखरेख व संघटना यांचे कार्य, इत्यादी घटक केन्सने गृहीत व स्थिर मानलेले आहेत, केन्सने 'तुलनेने स्थिर' स्वरूपाची विवेचनपद्धती स्वीकारली व ती गतिमान व्यवस्थेला लागू पडत नाही अशी त्यावर टीका केली जाते. पण ही टीका निरर्थक असून गतिमान अर्थव्यवस्थेला ती लागू करता येते असे दाखविले गेले आहे. तसेच केन्सने विकासाचे अर्थशास्त्र मांडलेले नाही अशी टीका ऐकू येते. पण केन्सच्या काळात विकासाचे अर्थशास्त्र उदयालाच आलेले नव्हते. किंबहुना मागास देशांतून जे अर्थशास्त्र शिकवले जाते ते सगळेच पाश्चिमात्य देशांतून व मुख्यतः इंग्लिश भाषेतून आलेले आहे. विकासाचे अर्थशास्त्र तिकडून आयात होईपर्यंत अविकसित राष्ट्रांतील अर्थशास्त्रज्ञांनीही त्याकडे लक्ष दिलेले नव्हते.

## सर्वसाधारण सिद्धान्त व अविकसित राष्ट्रांचे प्रश्न

'सर्वसाधारण सिद्धान्त' अविकसित राष्ट्रांतील प्रश्नांना लागू करण्याचाही प्रयत्न झालेला आहे. पण तो चुकीचा आहे. केन्सचा सिद्धान्त प्रगत देशांत, उत्पादक साधने, भाण्डवल व उपभोग्य वस्तूंची उत्पादनक्षमता मुबलक असताना, प्रभावी मागणी तोकडी पडून येणाऱ्या नाखुषीच्या बेकारीची चिकित्सा करतो. जिथे उत्पादक साधनांचाच अभाव आहे, अशा मागास देशांना तो लागू करता येत नाही. मागास देशांतील बेकारी प्रच्छन्न तशीच हंगामी आहे. शेतमजुरांना पूर्ण रोजगार मिळत नसला, तरी त्यांना अजिबात प्राप्ती होत नाही असे नाही. ही प्राप्ती पैशाच्या रूपात होत नसली तरी धान्याच्या रूपात होत असते. रोजगारासाठी स्थलांतर करायला मजूरवर्ग सहसा नाखूश असतो. ही नाखुशी घालविण्यासाठी बऱ्याच मोठ्या प्रमाणावर मजुरीच्या रूपाने प्रलोभन देऊ करावे लागते. शेतमजुराला तर धान्याच्या रूपाने मिळणारी मजुरी गमविण्याची व स्थलांतरित जागी त्यासाठी हातून पैसा खर्च करावा लागण्याची भीती सतत भेडसावीत असते. तसेच अपरिचित परिस्थितीला तोंड देण्याची भीतीही त्याला असते. म्हणजे या भीतीवर मात करण्याइतके हे प्रलोभन मोठे असावे लागते. मागास देशांतून उपभोगाची अस्तित्वातील पातळी इतकी खालच्या प्रतीची असते की वाढत्या प्राप्तीने (प्रगत देशांतल्याप्रमाणे बचत न वाढता) उपभोग लगेच उंचावू लागतो. यासाठी उपभोग्य वस्तूंचे विशेषतः श्रमिकांना लागणाऱ्या उपभोग्य उत्पादन वाढावे लागते व त्यासाठी लागणारी उत्पादनयंत्रणा तयार व तत्पर राखावी लागते. मागास देशांत याचाच अभाव असतो. त्यामुळे श्रमिकांना लागणाऱ्या वस्तूंचे भाव (प्रगत देशांत पूर्ण रोजगाराची स्थिती आल्यानंतर होणाऱ्या वाढीप्रमाणे) वाढू लागतात.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रगत देशांत गुंतवणुकीवर विनियोग केल्याने गुणकाचा परिणाम होऊन जशी भरभराट, वाढते उत्पादन व वाढता रोजगार येऊ शकतो तशी मागास देशांत येऊ शकत नाही. गुणकाचे परिणाम आढळून येण्यासाठी खालील गोष्टी आवश्यक आहेत.

१. नाखुशीची बेकारी.
२. यंत्रसिद्ध, तत्पर पुरवठ्याची व्यवस्था.
३. उपभोग्य वस्तूंच्या उद्योगात अतिरिक्त उत्पादन-क्षमता.
४. वाढत्या उत्पादनास लागणारे वाढते खेळते भांडवल.

या गोष्टींच्या अभावामुळे अप्रगत देशांत गुणकतत्त्व काम देत नाही.

प्रगत देशांत बचत, म्हणजे उपभोगावर कमी विनियोग हा भरभराटीस अडथळा ठरतो. उलट 'वाढते कष्ट व कमी उपभोग' म्हणजे वाढती बचत ही मागास देशांत प्रगतीची गरज व गुरुकिल्ली ठरते.

तेव्हा 'सर्वसाधारण सिद्धान्तात' गृहीत धरलेली परिस्थिती आणि प्रगत व मागास देशांमधील परिस्थिती ध्यानात न घेता तो सर्व तऱ्हेच्या परिस्थितीला जसाचा तसा लागू करू पाहणे बरोबर ठरत नाही.

## केन्स आणि मार्क्स

'सर्वसाधारण सिद्धान्ताचे' मक्तेदारी भांडवलशाहीचे बायबल असे रशियनांनी वर्णन केले आहे. 'सर्वसाधारण सिद्धान्ताचे' रशियन भाषेत १९४८ त भाषांतर झाले व पश्चिमात जगातील इतर कोणत्याही अर्थशास्त्रज्ञापेक्षा केन्सने रशियनांचे अधिक लक्ष वेधून घेतले. लेनिनपासून तो आजवर रशियन राजकारणात जसा बदल होईल तशी केन्सवर जहरी/सौम्य टीका सतत होत आली आहे. हेच त्याच्या प्रभावाचे द्योतक मानता येईल.

मार्क्सइतकाच केन्सचाही यूरोपच्या व्यवहारावर प्रभाव पडल्याने मार्क्सच्या अर्थशास्त्राशी केन्सच्या अर्थशास्त्राचे साम्यभेद दाखविण्याचा प्रयत्न झालेला आहे. अशी तुलना करणे मार्क्सवाद्यांना मान्य नाही. कारण मार्क्सच्या एकंदर तत्त्वज्ञानापासून त्याचे अर्थशास्त्र तोडणे व त्याचा केवळ एक अर्थशास्त्रज्ञ म्हणून अभ्यास करणे चुकीचे, नव्हे, केवळ पाप ठरते. परंतु एक समाजशास्त्रज्ञ व एक अर्थ-मीमांसक म्हणून मार्क्सचा अभ्यास आवश्यक ठरतो असे शुम्पीटरने मानलेले आहे.

भांडवलच भांडवलशाहीचा नाश करणार आहे असे मार्क्सचे भाकीत आहे. उलट भांडवलशाही जर नीट राबविली गेली तर ती नाश पावणारी नाही असा केन्सचा विश्वास होता. प्रभावी मागणीची न्यूनता घालविण्यासाठी समाजाने गुंतवणूक वाढविल्यास बेकारी नाहीशी होईल असे केन्सने दाखविले आहे. प्रभावी मागणी कमी पडते म्हणून बेकारी येते असे केन्सला वाटे; तर मार्क्सची बेकारी सर्वस्वी यंत्रजन्य होती. अशा बेकारीवरच भांडवलशाहीचे पोषण होते, भांडवलशाहीच्या विकासाला 'मजुरांचे राखीव सैन्य' आवश्यकच आहे असे मार्क्सचे मत होते. अशा राखीव सैन्यामुळे मजुरी केवळ जगायला आवश्यक इतक्या खालच्या पातळीवर येते; तर नफ्याची हाव सुटल्याने मजुरांची पिळवणूक करून भांडवलदार जी बचत करतो तिचा उपभोग न घेता भांडवलात गुंतवतो. या दोन्ही प्रक्रिया उपभोग कमी करणाऱ्या आहेत. मंदीचे वेगळे विवेचन मार्क्सने केलेले नाही. पण उपभोगन्यूनता हे त्याचे कारण मार्क्सच्या अर्थशास्त्रात शोधता येते. परंतु मार्क्सवर अशा तऱ्हेची कारणमीमांसा लादणे शुम्पीटरला मान्य नाही. उपभोगन्यूनतेचा सिद्धान्त मार्क्सचा नसून रॉबर्टस्चा आहे व उपभोगन्यूनतेच्या सिद्धान्ताच्या उणिवांची अर्थशास्त्रज्ञ मार्क्सला पूर्ण जाणीव होती असे शुम्पीटरने म्हटले आहे.[11]

केन्स आणि मार्क्स यांचे मूलभूत दृष्टिकोणच वेगळे आहेत. भाण्डवलशाही नाश होणारी असून तिचा लवकर नाश व्हावा यासाठी मार्क्स झटला. मजुरांना मिळणारा वाटा हा कमीकमी होत जाणारा आहे हे मार्क्सचे भाकीत खोटे ठरविले आहे. भाण्डवलशाहीचे स्वरूप मार्क्सच्या वेळी होते त्याहून वेगळे बनलेले आहे. तसे ते वेगळे करण्यात केन्सचा निश्चित भाग आहे.

## केन्सचा उदारमतवाद

केन्स उदारमतवादी, प्रागतिक व सुधारक होता. हुजूर पक्षाच्या मतांना त्याने कट्टर विरोधच केला. हुजूर पक्ष 'मुक्त व्यवस्थेचा' पुरस्कार करी, तर केन्सने पहिल्या महायुद्धानंतर या मुक्त व्यवस्थेचा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अंत झाल्याचे जाहीर केले. ( End of Laissez Faire, १९२६ ). सरकारी समाजवादाचा जरी नव्हे तरी सरकारी हस्तक्षेपाचा त्याने पुरस्कार केला आहे. 'सर्वसाधारण सिद्धान्ता'च्या शेवटी म्हटले आहे :

"माझ्या कल्पनेप्रमाणे, गुंतवणुकीचे काहीसे व्यापक सामाजीकरण एवढाच एक पूर्ण रोजगाराच्या जवळ जाण्याचा उपाय आहे; अर्थात यात खासगी उद्योजकांशी सार्वजनिक सत्ता सहकार्य करीत असता सर्व तऱ्हेच्या तडजोडी व युक्त्या वापरण्यास वाव नाही असे नाही. परंतु या पलीकडे जाऊन बहुतांश आर्थिक जीवनात सरकारी समाजवादाची पद्धत स्वीकारावी असा दावा मांडलेला नाही. उत्पादनाच्या साधनांचा मालकीहक्क मिळवणे एवढेच सरकारच्या महत्त्वाचे नव्हे. या साधनांच्या वाढीसाठी लागणारे साधनसामग्रीचे एकूण संख्यामान ठरवणे व ती साधने ज्यांच्या मालकीची आहेत त्यांना मिळावयाच्या मोबदल्याचा मूळ दर निश्चित करणे सरकारला शक्य झाले, तर सरकारने आवश्यक ते सगळे साध्य केले असे म्हटले पाहिजे. सामाजीकरणाचे आवश्यक उपाय समाजाची पूर्वापार घडी न मोडता आणि क्रमाने योजता येतात."

अर्थव्यवस्था पूर्ण रोजगाराकडे आपोआप झुकत असते, घसरी व तद्भव बेकारी हे तात्पुरते आलेले अरिष्ट आहे असे समजून बेकारी घालविण्यासाठी काहीही न करण्याच्या हुजूर पक्षाच्या वृत्तीचा केन्सला तिटकारा होता. तथाकथित साहस पतकरण्यात जो धोका आहे त्यापेक्षा काहीही न करण्यातील धोका फार मोठा आहे असेच त्याचे प्रतिपादन होते. बेकारीचे कारण प्रभावी मागणीची न्यूनता असून सरकारने पैशाची नीती व अर्थनीती यांद्वारा ही प्रभावी मागणी वाढविली पाहिजे असे त्याने सुचविलेले आहे.

'सर्वसाधारण सिद्धान्त' १९३०ची दीर्घ मंदी व अत्यंत बेकारीच्या वातावरणात लिहिला गेला आहे. दुसऱ्या महायुद्धानंतरदेखील पहिल्या महायुद्धानंतर आली तशी तीव्र घसर येणार अशीच सर्वत्र, केन्सचीदेखील, समजूत होती. म्हणजे दीर्घ काळ पूर्ण रोजगाराची व भाववृद्धीची स्थिती राहील अशी कुणालाही कल्पना नव्हती. या भाववृद्धीचे कारण मजुरीत व खर्चात सतत वाढ हे आहे असे जर केन्सला आढळले असते, तर मजुरी, नफा व किंमतींचे धोरण ठरविण्यास, म्हणजे ज्याला 'प्राप्तीचे धोरण' असे हल्ली म्हटले जाते ते धोरण प्रतिपादण्यास केन्सने मागेपुढे पाहिले नसते. सरकारच्या अशा प्रत्यक्ष हस्तक्षेपास त्याने विरोध तर राहूदेच, पण पुरस्कारदेखील केला असता अशी केन्सचे चरित्रकार सर रॉय हॅरड हे ग्वाही देतात.[१४]

याचप्रमाणे अविकसित राष्ट्रांतून खासगी गुंतवणुकीचा अभाव असतो व ही गुंतवणूक करण्याचा सरकारने उपक्रम करावा, म्हणजे थोडक्यात 'संमिश्र अर्थव्यवस्थेचा' स्वीकार करावा अशी धोरणी विचारसरणी केन्सच्या सिद्धान्तावर आधारता येते.

उदारमतवादामागे 'चांगला समाज' निर्माण व्हावा अशी केन्सची दृष्टी होती. १९३९ त त्याने म्हटले होते :

"प्रश्न असा आहे, की एकोणिसाव्या शतकातील 'मुक्त' व्यवस्थेतून आपण बाहेर पडणार आहो की नाही आणि उदारमतवादी समाजवादी युगात आपण शिरणार आहो की नाही. म्हणजे व्यक्तीचा मान राखून, त्याचे निवड करण्याचे स्वातंत्र्य, त्याची श्रद्धा, त्याचे मन व त्याची अभिव्यक्ती, त्याची उपक्रमशीलता व त्याचे धन या सर्वांचे संरक्षण करून, सार्वजनिक हितासाठी आणि सामाजिक व आर्थिक न्यायासाठी संघटितपणे आपण झटणार आहो की नाही." [१५]

केन्स समाजवादी नव्हता. समाजवादात अनुस्यूत असलेला वर्गलढा त्याला कधीच मान्य नव्हता. मध्यमवर्ग, शास्त्रज्ञ व बुद्धिजीवी यांच्याबद्दल त्याला आदर होता. व्यक्तिवादातील दोष वगळल्यास त्याशिवाय व्यक्तिस्वातंत्र्य टिकविण्याची, व्यक्तींच्या उपक्रमशीलतेला प्रोत्साहन देण्याची व व्यक्तीतील नैसर्गिक पण घातक प्रवृत्तींना वळण लावण्याची अन्य व्यवस्था नाही अशी त्याची श्रद्धा होती. विषमता व बेकारी आणणारा भांडवलाचा तुटवडा हे दोष प्रयत्नाने नाहीसे करता येण्यासारखे आहेत, योग्य ते कर लादून विषमता नाहीशी करता येईल अशी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्याची समजूत होती. तसेच व्याजाचा दर कमी राखून भांडवलाचा तुटवडा नाहीसा करता येईल असे त्याचे मत होते. असा तुटवडा नाहीसा केल्यास भांडवलशाहीला जे खंडधारकी क्रियाशून्य स्वरूप आलेले आहे ते नाहीसे होईल व त्यासाठी क्रांतीची जरुरी लागणार नाही असे त्याने प्रतिपादिले आहे.

तेव्हा टोकाचा व्यक्तिवाद व अनियंत्रित खासगी भांडवलशाही या हुजूर पक्षाच्या धोरणांना केन्सचा सतत विरोध होता. हुजूर पक्षाला त्याचा विरोध कडवा होण्यास पहिल्या महायुद्धानंतरचा व्हर्सायच्या तहदेखील कारणीभूत आहे. या तहाला हुजूर पक्षाचा पूर्ण पाठिंबा होता. जर्मनीकडून युद्धाचा सगळा खर्च वसूल करण्याचे या पक्षाचे धोरण केन्सला घातक वाटले व ते तसे ठरलेही. १९१८ साली ब्रिटनमध्ये सार्वजनिक निवडणुका होत्या. या निवडणुकांच्या वेळी स्त्रियांना मताधिकार होता व त्यांचा मतदार-संघ मोठा होता. राजकारण हीन पातळीवर आलेले होते. पक्षाच्या ध्येयधोरणातून मतदारांना राजकीय शिक्षण मिळण्याऐवजी मतदारांच्या विचारप्रवाहा-नुसार धोरणे ठरविली गेली. "कैसरला फाशी द्या", "साल करकरेपर्यंत लिंबू पिळा" अशा तऱ्हेच्या आगलाव्या घोषणांचा त्यात अधिक फैलाव होता. अशा मतदारसंघाला डावलण्याचे धैर्य हुजूर पक्षात नव्हते, आणि व्हर्सायच्या तहाच्या कक्षेबाहेर जाऊन जर्मनीला 'पिळून' काढण्याचे धोरण अवलंबिले गेले. या अतिसंकुचित वृत्तीची केन्सला घृणा वाटली. शत्रूकडूनही खंडणी वसूल करताना त्याच्या शक्तीचा विचार केला पाहिजे असा केन्सचा (उदार) विचार होता.

## केन्शियन अर्थशास्त्र

'सर्वसाधारण सिद्धान्त' प्रसिद्ध झाल्यावर त्यावर टीका, सुधारणा व बदल सतत होत राहिला आहे. शुद्ध केन्सचे व केन्शियनांचे (केन्सकुलीन) सिद्धान्त यांत फरक आहे. केन्शियन सिद्धान्तात केन्सच्या उणिवा घालविण्याचा व त्यात प्रगती करण्याचा प्रयत्न होत राहिला आहे; परंतु त्याचबरोबर केन्सच्या तरल व सुप्त कल्पनांना कलाटणीदेखील दिली गेली आहे. ही कलाटणी कुठे व कशी दिली गेली याचा मागोवा घेणे हा स्वतंत्र संशोधनाचा व प्रस्तुका-पलीकडचा विषय आहे.

## केन्सवाद व नवपैसावाद

केन्स आणि केन्शियन्स यांच्या सिद्धांतावरून बेकारी-मंदीवर उपाय म्हणून मागणीचे व्यवस्थापन केले जावे व प्राप्तीचे धोरण स्वीकारावे असा धोरणविषयक निष्कर्ष निघतो. प्रभावी मागणी ही उपभोगावरील विनियोग व गुंतवणुकीवरील विनि-योग यांवर अवलंबून असते. उपभोगप्रवृत्ती बव्हंशी स्थिर असल्याने उपभोगावरील विनियोगात फारसे बदल होत नाहीत. पण गुंतवणूक ही स्वायत्त आहे. व्याजाच्या दराच्या मानाने अपेक्षित नफ्याच्या दरात सारखे बदल होत असल्याने गुंतवणुकीवरील विनियोगात सतत चढउतार होत असतात. या चढउतारांना विरोधी अशी भूमिका घेऊन सरकारने विनियोगात बदल करावा. व्याजाचा बोजा टाळण्या-साठी व नफ्याच्या दराची अपेक्षा वाढती राहावी म्हणून व्याजाचा दर कमी राखला जावा.

दुसऱ्या महायुद्धानंतर या धोरणाचा पाठपुरावा केला गेला. पण यामुळे भाववृद्धी सतत अनुभवास येऊ लागली. परदेशी देणेबाकी वाढू लागली. यामुळे या धोरणाविषयी अनेक तऱ्हेचे संशय व्यक्त केले जाऊ लागले. या धोरणाच्या समयसाधकतेत तर चूक होत नसावी ना? किंवा या धोरणाचा परिणाम अस्थिरता निर्माण करण्यात तर होत नसावा? केन्सने पैशाच्या पुरवठ्याचा व अर्थव्यवहारांचा प्रत्यक्ष संबंध नाही असे प्रतिपादिले. पैशाला हे जे गौण स्थान दिले गेले तिथेच तर चूक नसेल? नाही तर सतत भाववृद्धीचे कारण काय? आणि राज-कोषीय नीतीत वाढत्या परदेशी देणे-बाकीवर कोणता तोडगा दिसत नाही. त्यात सरकारी हस्त-क्षेपास मान्यता आहे. पण मुक्त अर्थव्यवस्थेच्या पुरस्कर्त्यांना तो कसा मानवणार? यामुळेही राज-कोषीय नीतीला विरोध व्यक्त केला जाऊ लागला.

१९५७ च्या सुमारास दोन घटना घडल्या. एक, ब्रिटनमध्ये पैशासंबंधीच्या नीतीचा विचार करण्या-साठी लॉर्ड रॅडक्लिफ् यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमली गेली. या समितीने मागणीच्या व्यव-स्थापनात पैशाचा काही उपयोग नाही असे प्रति-पादिले. म्हणजे केन्सचा विचार तिने उचलून धरला. अमेरिकेत प्रोफेसर मिल्टन फ्रीडमन यांच्या नेतृत्वा-खाली एक नवा विचारप्रवाह जोर धरू लागला.

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रोफेसर फ्रीडमन व श्रीमती श्वार्टझ् या दोघा अर्थतज्ज्ञांनी अमेरिकेचा १८६७ ते १९६० या जवळजवळ शंभर वर्षांचा पैशाचा इतिहास पाहिला. तेव्हा त्यांना असे आढळले की, पैशाच्या पुरवठ्याचा आणि पैशाने गणलेल्या राष्ट्रीय प्राप्तीचा प्रत्यक्ष (जरी थोड्या विलंबाने) सहसंबंध आहे. अर्थव्यवहारावर पैसा व त्याच्या संचरणाचा वेग यांचा कार्यकारणी प्रभाव असतो. पण पैशाच्या संचरणाच्या वेगात फारसे बदल होत नसल्याने पैशातील राष्ट्रीय प्राप्तीत जे फेरफार आढळले (आढळतात), ते पैशाच्या पुरवठ्यात फेरबदल झाले म्हणून; अर्थव्यवहारातील चढउतारांचे कारण पैशाच्या पुरवठ्यातील फेरबदल होत. म्हणून पैशातील राष्ट्रीय प्राप्ती स्थिर राखावयाची असेल तर पैशाच्या पुरवठ्यात नियमित वाढ होत राहावी. धोरणाच्या दृष्टीने अल्पमुदतीतील चढउतारांवर फारसे अवलंबून राहणे योग्य नसल्याने भाववाढीविना नियमित आर्थिक प्रगती होण्यासाठी दीर्घ मुदतीने पैशाच्या पुरवठ्यात ४–५ टक्क्याने नियमित वाढ होत राहावी. यात (केन्सने दिलेल्या) व्याजाच्या दरापेक्षा पैशाच्या पुरवठ्यावर अधिक भर आहे. व्याजाच्या दरात होणारे बदल हे तत्कालिक व कालांतराने नाहीसे होणारे आहेत. केन्सने प्रतिपादिल्याप्रमाणे पैसा बाळगण्याचा रोखे हा एक पर्याय नसून पैशाला कोणतीही पर्यायी मत्ता नाही. संपत्ती बाळगण्याचा पैसा हा एक प्रकार आहे. आणि संपत्तीचा विचार करताना कायम प्राप्तीचा विचार येतो. अशा कायम प्राप्तीचा आणि पैशाचा सहसंबंध असून तो स्थिर आहे. आणि पैशाचा पुरवठा स्वायत्त आहे. पैशाचा पुरवठा वाढेल तसे अर्थव्यवहारावर परिणाम होत असल्याने पैशाचा गुणक महत्त्वाचा आहे.

फ्रीडमन आणि त्याचे अनुयायी यांच्या सिद्धान्ताना नवपैसावाद असे संबोधिले जाते. केन्स किंवा केन्शियन्स यांचा (राजकोषीय नीतीवर भर देणारा) केन्सवाद व फ्रीडमन यांचा (पैशाच्या पुरवठानीतीवर भर देणारा) नवपैसावाद असे दोन विरोधी विचारप्रवाह अर्थशास्त्रीय वाङ्मयात आज प्रसृत आहेत. त्यांचा स्थूल उल्लेख इथे केला आहे. त्यांच्यातील सूक्ष्म भेदांची चर्चा हा स्वतंत्र निबंधाचा विषय आहे.

पैसा म्हणजे काय ? पैशाच्या पुरवठ्याचे अर्थव्यवहारावर होणारे परिणाम कोणत्या रीतीने पसरतात ? केन्सच्या उपभोगप्रवृत्तीवर आधारित गुणकास महत्त्व आहे का फ्रीडमनच्या पैशाच्या गुणकास महत्त्व आहे ? व्याजाच्या दराचे स्थान काय ? हे प्रश्न महत्त्वाचे आहेत व त्यांच्या उत्तरावर धोरण अवलंबून आहे.

पैसा म्हणजे केवळ नोटा, नाणी आणि बँकांच्या ठेवी नव्हेत. अशा पैशाची टंचाई भासली तर लोक इतर पर्याय शोधतात. घरे बांधणाऱ्या संस्थांच्या ठेवी, व पत-कार्डे ही पैशाचे कार्य करताना आढळली आहेत. तेव्हा पैशाच्या पुरवठ्याची निःसंदिग्ध व्याख्या देता येत नाही. चलनाचे नियंत्रण करू गेल्यास पैसा म्हणून इतर प्रकार उद्‌भवतात. पैशाच्या नियमनाचे धोरण अलीकडे पाश्चिमात्य देशांतून अवलंबिले गेले आहे. पण त्यामुळे भाववृद्धी थोपवली गेल्याचे दिसून आलेले नाही. उलट ब्रिटनमध्ये प्राप्तीचे धोरण आचरिले गेले तेव्हा भाववृद्धी आटोक्यात होती; पण मजूरवर्गाने हे धोरण अमान्य केले तेव्हा परत भाववृद्धी आली.

बरे, पैशाच्या इतिहासावरून पैशाचा प्राप्तीचा सहसंबंध फ्रीडमन यांनी दाखविला. पण याच इतिहासावरून अर्थव्यवहारानुसार पैशाच्या पुरवठ्याचे पश्चात् समायोजन होत असते असेही अनुमान काढता येते. पैशाचा पुरवठा वाढूनही अर्थव्यवहार कुंठित झाल्याची उदाहरणे आहेत. तेव्हा नवपैसावादाने केन्सवादावर मात केली असे मुळीच म्हणता यावयाचे नाही.

## धोरणासाठी सिद्धान्त

केन्सने सिद्धान्ताच्या मोहाने सिद्धान्त कधी मांडलेले नाहीत. आपल्या सिद्धान्ताचा उपयोग व्यवहारात आपल्यापुढील प्रश्न सोडविण्याचे धोरण ठरविण्यात झाला पाहिजे, यासाठी तो नेहमीच व्यग्र असे. व्यवहारी उत्तरे शोधण्याच्या दृष्टीची छाप केन्सच्या सिद्धान्तावर पडलेली आहे. याचा परिणाम असा दिसतो की केन्स नेहमी अल्पमुदतीचा विचार करीत आला. अभिजात सिद्धान्ताने दीर्घ मुदतीतील समतोलपणाचे अर्थशास्त्र मांडले; तर केन्सचा संबंध अल्पमुदतीतील असमतोल व्यवस्थेशी



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. अभिजात सिद्धान्तातील गृहीतकृत्ये प्रत्यक्षात पुरी होणारी नसल्याने प्रत्यक्ष भेडसावणारे आर्थिक प्रश्न ( अपुऱ्या रोजगाराचा प्रश्न ) सोडविण्यास त्याचा मुळी उपयोग नाही असे केन्सने प्रतिपादिले आहे. त्याच्या मते ( सरकारी हस्तक्षेपाने ) पूर्ण रोजगारास अनुरूप राहील इतके एकूण उत्पादनाचे संख्यामान प्रस्थापित करणे शक्य झाले तर त्या बिंदूपासून पुढे अभिजात सिद्धान्त लागू पडतो. पण प्रभावी मागणी तोकडी पडून उत्पादनाचे संख्यामान पूर्ण रोजगारासकट समतोलाच्या खालच्या बिंदूभोवती घोटाळते व बेकारी टिकून राहते. या सिद्धान्तावर आधारून यातून पुढे सर विलयम बिव्हरिज् यांनी मांडलेले 'पूर्ण रोजगाराचे धोरण' ब्रिटनने स्वीकारले.

आपल्यापुढील अल्पमुदतीतील प्रश्नांचा सैद्धान्तिक कार्यकारणभाव पाहताना केन्सला अंतःस्फूर्तीतून कल्पना सुचत. या कल्पनांना मागाहून तो व्यवस्थित तर्काधिष्ठित स्वरूप देई. त्यासाठी तो परिश्रमही घेई. पण त्या सगळ्याचे मूळ त्याची प्रतिभाच होती. व्यवस्थित मांडलेल्या सिद्धान्तातून उद्भवणाऱ्या धोरणांचा तो पाठपुरावा करी व ही धोरणे सरकारदरबारी मान्य व्हावी म्हणून तो नेटाने चर्चा करायला नेहमी तयार असे. चर्चा करून, मने वळवून, लोकांनी अधिक स्पष्ट विचार करावा यासाठी त्याने नेहमी प्रयत्न केला. बुद्धी व सौंदर्यभावना या दोन्हींना आवाहन करण्याचा त्याचा प्रयत्न राही.[१६]

ज्या सामाजिक व्यवहारातून आणि परिस्थितीतून समाजशास्त्रे निगमनली जातात त्याचे हे वैशिष्ट्य की परिस्थिती नेहमी बदलत राहते. यामुळे नवेनवे प्रश्न उपस्थित होतात. या समस्या सोडविण्यात समाजशास्त्राला ( अर्थशास्त्राला ) पुढे यावे लागते. त्यासाठी या समस्यांचे पूर्ण आकलन तर आपल्याला व्हावे लागतेच; पण शिवाय आपण निर्माण केलेल्या व गुरफटवून टाकणाऱ्या विचारांच्या कोषातून बाहेर पडावे लागते.

परिस्थितीचे विश्लेषण करून ती सुधारण्यासाठी धोरण ठरविण्याच्या दृष्टीने सिद्धान्त मांडताना केन्सला पूर्वविवेचनपद्धतीचा त्याग करावा लागलेला आहे. ही गोष्ट त्याच्या 'पैशासंबंधीचा लघुप्रबंध' (१९२३), 'पैशासंबंधीचा निबंध' (द्विखंडात्मक, १९३०) व 'सर्वसाधारण सिद्धान्त' (१९३६) या ग्रंथांतील मीमांसा-प्रक्रियेतील विकास, दोष घालविण्याची तत्परता व दोष आढळल्यास (कुणी दाखवून दिल्यास) त्याबद्दल वाटणारी अस्वस्थता व ही अस्वस्थता नाहीशी होईपर्यंत त्यात व्यवस्थितपणा व सुसूत्रपणा आणण्याची धडपड यातून सिद्ध झालेली आहे. 'पैशासंबंधीचा निबंध' प्रसिद्ध झाला तेव्हा त्यावर बरीच टीका झाली. हा निबंध लिहीत असता आपण परंपरागत चाकोरीत वावरत होतो असे केन्सने म्हटले आहे. तो पैशाच्या 'पूंजीच्या' सिद्धान्तावर आधारलेला होता व या (अभिजात) गोंधळातून झालेली अंतिम सुटका म्हणजे 'सर्वसाधारण सिद्धान्त' होय. 'पैशासंबंधीच्या निबंधा'तून 'सर्वसाधारण सिद्धान्ता'त झालेली परिणती इतरांपेक्षा त्याला अधिक स्पष्ट होती. ( या दोन ग्रंथांतील विकास-संबंध लोकांना उमजलेला नाही अशी त्याची तक्रार होती.) आणि व्यासंगामुळे आपल्या विचारात सहज उत्क्रांती होत आहे असे वाटत असल्याचे केन्सने नमूद केले आहे.

'सर्वसाधारण सिद्धान्त' प्रसिद्ध झाल्यावर त्यावर आणखी चर्चा झाली. वादविवाद झाले. स्वतः केन्सनेच याला चालना दिली. या टीकांची दखल घेण्याचा व आणखी विचार करायला हवा अशा मुद्द्यांचा विस्तार करण्याचा व त्यासाठी "सर्वसाधारण सिद्धान्ताच्या तळटीपा" लिहिण्याचा केन्सचा मनसुबा होता. अभिव्यक्तीच्या नवीन मार्गाचा तो शोध घेत होता. परंतु हा संकल्प प्रकृती-अस्वास्थ्यामुळे (१९३७ च्या उन्हाळ्यात केन्सला हृदयविकाराचा झटका आला व त्याची उमेद नाहीशी झाली), दुसऱ्या महायुद्धात व नंतर तो इतर क्षेत्रांतील कार्यात गुंतल्यामुळे त्याला पुरा करता आलेला नाही. 'सर्वसाधारण सिद्धान्ता'त कशी सुधारणा झाली असती हे सांगणे कठीण असले, तरी तो त्याने सुधारला असता अशी ग्वाही आपल्याला मिळते.

## अर्थशास्त्र हे नीतिशास्त्र

परिस्थितीचे सतत विश्लेषण करणे व त्यातून उद्भवणाऱ्या प्रश्नांकडे आपले सतत लक्ष वेधणे ही केन्सची महत्त्वाची देणगी आहे असे प्रोफेसर ई. ए. जी. रॉबिन्सन यांनी म्हटले आहे.[१७] केन्सने मूलभूत



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रश्न उपस्थित केले आहेत. रोजगाराची पातळी कशी ठरते, अर्थव्यवस्था पूर्ण रोजगाराच्या स्थितीत आपोआप स्थिर राहते काय, व्याजाचा दर कसा ठरतो हे प्रश्न अद्याप आपल्याला भेडसावीत आहेत. त्याच्या तिन्ही ग्रंथांतील समान सूत्र बेकारीच्या प्रश्नाचा विचार हे आहे, असे दिसून येते. केन्सला छेडणाऱ्या प्रश्नांची उत्तरे अद्याप आपल्याला मिळालेली नाहीत.

रॉय हॅरड यांना १९३८ मध्ये लिहिलेल्या एका पत्रात केन्सने लिहिले आहे :

"प्रतिकृतींच्या स्वरूपात विचार करण्याचे अर्थशास्त्र हे एक शास्त्र आहे. आपल्या समकालीन परिस्थितीस लागू पडणाऱ्या प्रतिकृतीची निवड करण्याच्या कलेला हे शास्त्र जोडले गेले आहे. ते तसे राहणे भाग पडले आहे. कारण नैसर्गिक शास्त्राप्रमाणे ते ज्या सामग्रीस लागू करावयाचे ती सामग्री कालौघात अनेक बाबतीत एकजिनसी राहणारी नाही. कायम स्वरूपाच्या, किंवा तुलनेने स्थिर स्वरूपाच्या घटकांना क्षणभंगुर किंवा बदलत्या घटकापासून वेगळे करणे आणि त्यातून क्षणभंगुर आणि बदलत्या घटकांबद्दलचा विचार करण्याची तर्कसंगत पद्धत हुडकणे व विशिष्ट परिस्थितीत उद्भवणारी त्यातील कालसंगती समजून घेणे हा प्रतिकृती रूपण्याचा हेतू आहे.

चांगले अर्थशास्त्रज्ञ विरळ आहेत. कारण चांगल्या प्रतिकृतीची निवड करण्यासाठी जो जागरूकपणे वेध घ्यावा लागतो तो वेध घेण्याची देणगी, जरी यासाठी खास बौद्धिक तंत्राची आवश्यकता नसली तरी, अतिशय दुर्लभ आहे.

दुसरे असे, की अर्थशास्त्र हे मूलतः नीतिशास्त्र आहे. (रॉबिन्स यांना वाटते तसे) नैसर्गिक शास्त्र नव्हे. याचा अर्थ त्यात आत्मनिरीक्षण व मूल्यांची निवड अनुस्यूत आहे... याच्या जोडीला हेतू, अपेक्षा, मानसिक अनिश्चितता यांचाही अर्थशास्त्राशी संबंध येतो असे मला म्हणता येईल. आपला विषय स्थिर स्वरूपाचा व एकजिनसी आहे असे समजण्यापासून आपण सतत सावध राहिले पाहिजे."

केन्सचे मूल्यमापन करताना या इशाऱ्याचा आपल्याला विसर पडता कामा नये.

**कलासक्त केन्स**

केन्सचे व्यक्तिमत्त्व केवळ अर्थशास्त्रज्ञ म्हणून परिसीमित नव्हते, त्याचा इतर कलांतही रस होता. पत्नी व मित्र यांमुळे त्याची कलासक्ती वाढीला लागली होती. उत्तमोत्तम चित्रे खरेदी करण्याचा त्याला छंद होता. इन्ग्रेस, डेगस, पिकासो, ब्राक इ. फ्रेंच व इंग्लिश चित्रकारांच्या कलेचे नमुने त्याच्या चित्रसंग्रहात आहेत. त्याच्या संग्रहातले एक डेलॅक्रो यांचे चित्र तर १८१९ सालातले आहे. आपल्या चित्रसंग्रहावर त्याचे प्रेम होते व त्यातील चित्रे कुठे प्रदर्शनात ठेऊ देण्यास तो नाराज असे. यातून एक ना दुसऱ्या नात्याने—आणि मुख्यतः आर्थिक— चित्रकार व नृत्यकार यांच्या संघटनांशी त्याचा संबंध आला. लंडन आर्टिस्ट्स असोसिएशन स्थापन करण्यात त्याचा हात होता. स्वदेशात विविध प्रांतांत चित्रप्रदर्शन भरविण्यात व परदेशातील चित्रप्रदर्शनात इंग्लिश चित्रकारांना योग्य स्थान मिळवून देण्यात या संघटनेने प्रयत्न केला.

पुस्तक खरेदी करण्याचे त्याचे वेडही प्रसिद्ध आहे. पण चित्रसंग्रह खरेदीत नसलेली चोखंदळ दृष्टी त्याच्या ग्रंथसंग्रहात दिसते. संस्कृतीच्या प्रगतीला हातभार लावण्यात त्याला महत्त्वाच्या वाटणाऱ्या सगळ्या लेखकांचे संग्रह बाळगण्याचा त्याने प्रयत्न केला. एखाद्या ग्रंथकाराचे सगळे ग्रंथ, या ग्रंथांच्या सगळ्या व जुन्यांतल्या जुन्या आवृत्त्या, अन्य भाषांत झालेली त्यांची भाषांतरे यांचा तो संग्रह करीत असे. हे जुने ग्रंथ तो स्वतः वाचून काढी. 'सध्या कोणते पुस्तक वाचीत आहा ?' अशी एकदा केन्सच्या पुतण्याने पृच्छा केली. जॉर्ज विदर (१५८८–१६६७) या कवीचा १६३५ तला कवितेचा संग्रह असे केन्सचे उत्तर होते. त्याच्या संग्रहातील काही ग्रंथ केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या मार्शल लायब्ररीत तर उरलेले त्याच्या आवडत्या किंग्ज कॉलेजच्या वाचनालयात आता आहेत. विद्यार्थ्यांना त्यांचा उपयोग व्हावा अशी त्याची इच्छा होती.

केंब्रिजचे आर्ट्स थिएटर हे केन्सच्या श्रमाचेच फळ आहे. या थिएटरच्या ध्वनिक्षेपणापासून तो कलाकारांना मागील भागात सर्व सुखसोयी उपलब्ध करून देण्याकडे केन्सने लक्ष दिले होते. या थिएटरच्या खर्चाचा बव्हंशी भाग केन्सनेच उचललेला

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

होता. अर्धशतकाहूनही अधिक काळ ज्या आपल्या आईवडिलांनी केंब्रिज विद्यापीठ व केंब्रिज शहर यांची सेवा केली त्यांचे आर्ट्स थिएटर हे स्मारक ठरावे म्हणून त्यासाठी केन्सने एक ट्रस्ट करून केंब्रिजच्या मेयरच्या स्वाधीन केले आहे.

कला व संगीत यांना प्रोत्साहन देणाऱ्या १९४० त निघालेल्या मंडळाचा १९४२ त केन्स अध्यक्ष झाला. हे अध्यक्षपद त्याच्या मृत्यूपर्यंत त्याच्याकडेच होते. यातून पुढे आर्ट्स कौन्सीलची व त्यातून ब्रिटनमधील कलांना सरकारी प्रोत्साहन देण्याची कल्पना निघाली. तिचा पाया केन्सनेच घातला. या मंडळाच्या कार्यात केन्सचे, आंतरराष्ट्रीय आर्थिक मंडळाच्या चर्चेत तो व्यग्र होता तरी, बारीक लक्ष असे. १९४४ त रशियन (बॅले) नृत्यपथक लंडनला आणवावे असा एक प्रयत्न होता. याबद्दलची सविस्तर चर्चा ब्रेटन वुडस् येथे आंतरराष्ट्रीय आर्थिक मंडळावरील रशियन सभासदाशी केन्सने केली होती (पुढे राजकीय कारणासाठी हा प्रयत्न फसला हा भाग वेगळा !). ब्रिस्टल येथील थिएटर रॉयल हे पुराणे नाट्यगृह. १९४२ च्या बाँबहल्ल्यात त्याला तडा गेला होता. ते पुरते पाडावे लागते की काय अशी भीती निर्माण झाली होती. पण केन्सच्या कला व संगीत यांना प्रोत्साहन देणाऱ्या मंडळाने ते भाड्याने घेऊन चांगले दुरुस्त केले व वर्षाच्या आत तिथे पुन: नाटके होऊ लागली.

कलेबद्दलची त्याची ही आसक्ती त्याचे स्वत:चे तत्त्वज्ञान व्यक्तविते. अर्थशास्त्रज्ञ किंवा राजकीय पुढाऱ्यापेक्षा सर्जनशील कलाकार खरोखर मोठा होय असे त्याला वाटे. आर्थिक प्रश्नांना (व्यवहाराला) गौण स्थान मिळण्याचे आणि त्याऐवजी जीवनाच्या व मानवी संबंधाच्या प्रश्नांना– सर्जनशीलता, वर्तन आणि धर्म यांच्या मानवाच्या खऱ्या प्रश्नांना– हृदय आणि बुद्धीच्या क्षेत्रांत प्रमुख स्थान मिळण्याचे दिवस फार दूर नाहीत असे केन्सला नेहमी वाटत राहिले.[१८]

केन्सचा एका रशियन नर्तकीशी विवाह झाल्याचे मागे आलेच आहे. त्या दोघांचे वैवाहिक जीवन 'आश्चर्यकारक रीत्या यशस्वी' ठरले होते. 'केन्सने जीवनात प्रसन्नताच आणली व त्याच्या मृत्यूच्या आघातातून वर यायला निदान एक तप लागेल,' असे उद्गार श्रीमती लीडिया यांनी काढले आहेत.

श्रीमती लीडिया केन्स खेळकर आणि विनोदी. न्यूयॉर्कमध्ये एकदा उष्म्याची लाट आली असता चक्क कपडे काढून त्या रेफ्रीजरेटरमध्ये बसल्याचे सांगतात. 'तमारा कार्साव्हिना' या नृत्यातला अग्निपक्षी हिवाळ्यात गारठू नये म्हणून विजेचा जाळ उभा करायचा त्यांनी प्रयत्न केला होता. श्रीमती केन्स यांनी केन्सच्या आजारपणात सतत काळजी वाहिली. फार बोलल्याने त्याला त्रास होऊ नये म्हणून पाहुण्यांवर त्या दाब ठेवीत. अर्थशास्त्रज्ञांचा त्यांना तिटकारा होता. केन्सचे त्यावेळी गाजलेले "शांततेचे आर्थिक परिणाम" तर राहोच; पण रॉय हॅरड यांनी लिहिलेले केन्सचे चरित्रदेखील त्यांनी वाचलेले नाही. आणि तरीदेखील केन्सच्या जीवनात श्रीमती केन्स यांचे प्रसन्न व प्रेरक असलेले स्थान आपल्याला दृष्टिआड करता येत नाही.[१९]

## संदर्भ व टीपा

१. केन्सच्या गोत्रातील, केन्सवादी, केन्सोद्भव, केन्सचे भाष्यकार, किंवा/आणि टीकाकार या अर्थाचा हा शब्द आहे.

२. इकॉनॉमिक जर्नल, जून १९७५, पृ. २६९.

३. पाहा : On Keynesian Economics and the Economics of Keynes– Axel Leijonhufrud (१९६८).

४. पाहा : Indian Currency and Finance– J. M. Keynes, पृ. १००.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

५. New Economics- (Ed.)- S. E. Harris यातील शुम्पीटरचा लेख पृ. ७९.
६. Life of John Maynard Keynes- R. F. Harrod, पृ. ३३०.
७. उपरोक्त पृ. २६९.
८. उपरोक्त पृ. ४९३.
९. Essays on John Maynard Keynes (Ed.) Milo Keynes, पृ. २०५.
१०. पाहा : International Monetary Policy- W. M. Scammell, पृ. १४९ वरील तळटीप.
११. Portraits from Memory- II- Burtrand Russell, The Listener, July 17, 1952, पृ. ९७.
१२. J. M. Keynes : Economist, Auther, Statesman- E. A. G. Robinson, Economic Journal, June 1972, पृ. ५४१.
१३. History of Economic Analysis- J. A. Schumpeter, पृ. ७४९-७५०
१४. पाहा : Keynes : Aspects of the Man and his Work (Ed.) - D. E. Moggridge, पृ. १५.
१५. उपरोक्त पृ. ६९.
१६. Economic Journal, June 1975, पृ. २६७.
१७. Economic Journal, June 1972.
१८. Essays on John Maynard Keynes (Ed.)- Milo Keynes, पृ. २६८.
१९. उपरोक्त पृ. ६-८.

---

**सातारा सहकारी साखर कारखाना लि.**

भुईंज किसनवीरनगर ता. वाई जि. सातारा

पिन कोड नं. ४१५५३०

तार- "किसानसाकर" फोन- भुईंज ४०

" कै. आबासाहेब वीर यांचे सहकारातून समृद्धी हे तत्त्व प्रत्यक्षात साकार करण्यासाठी आम्ही वचनबद्ध आहोत."

रा. शा. मोहोरीर — प्र. कार्यकारी संचालक
वि. रा. उर्फ बाबासाहेब जाधव — व्हा. चेअरमन
डी. बी. कदम — चेअरमन

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सांस्कृतिक मूल्यनिर्धारणा

ना. बा. मराठे

स्वातंत्र्योत्तर काळात जीवनातील साऱ्या जुन्या मूल्यांना व्यक्तीच्या इच्छेनुसार वा आवश्यकतेनुसार मागे सारून ज्याच्या त्याच्या सोयीनुसार त्यांचा वापर होऊ लागला आहे. जुनी मूल्ये बाजूला सारून नवा मानवतावाद आणण्याचा अट्टाहास पुरोगामी, विचारसरणीच्या धुरीणांनी मांडला. या अव्यक्य मानवतावादाच्या नावे व्यासपीठावरून व्याख्याने ऐकायला मिळत असतानाच रोजच्या वर्तमानपत्रांतून दरवडे, निर्घृण हत्या, बँकांची लुटालूट, अधिकृत भ्रष्टाचार, स्त्रियांची विटंबना, संप, दंगेधोपे यांसारख्या नाना तऱ्हेच्या वृत्तांनी भरलेले रकानेच्या रकाने रोज ताज्या बातम्यांच्या स्वरूपांत वृत्तपत्रे समाजाच्या माथी मारीत बसतात. दंगेधोपे, मारामारी, लुटालूट, रेपकेस यांसारख्या घटनांची रेलचेल असल्याशिवाय हिन्दी-चित्रपट-सृष्टी चालत नाही. सिनेनटांची जाहिरात करून करून त्यांचे वार्षिक उत्पन्न कित्येक लाखांवर पोचले असल्याच्या चटकदार बातम्या वाचून त्यात रममाण होणारा आजचा तरुण वर्ग पाहिला म्हणजे १९४०-५० या दशकातील तरुण वर्गाचे आदर्श लक्षात भरतात.

हे लक्षात घेऊन जाने. ३-५,१९८१ रोजी रामकृष्ण मिशनने एक मेळावा आयोजित केला होता. 'Value orientation in solving human problems-' या विषयावर भारतातील त्या त्या विषयातील तज्ज्ञांना बोलावून त्यांचे विचार लेखस्वरूपात आता उपलब्ध झाले आहेत. सरकारी यंत्रणा, शिक्षण, व्यवस्थापन, कामगार, मालक, तत्त्वज्ञानी, धार्मिक नेते अशा नाना क्षेत्रांतील अधिकारी व्यक्तींनी यात सक्रिय भाग घेतल्याने आजच्या सामाजिक-आर्थिक-धार्मिक परिस्थितीचे पुन: विहंगमावलोकन करून सामाजिक-सांस्कृतिक मूल्यांची पुनः प्रतिष्ठापना करण्याची वेळ आली आहे असा एकूण त्या मेळाव्याचा सूर होता. जिज्ञासूंनी वरील नावाखाली प्रसिद्ध झालेले पुस्तक मुळांतूनच वाचलेले बरे. कारण संस्कृति-सामाजिक नीती किंवा व्यक्तिगत स्वार्थ-सामाजिक कल्याण यांसारख्या अन्तर्द्वंद्वांचा पुनर्विचार व्हायला हवा असेल तर त्या विचारांच्या चारी दिशा डोळ्यांसमोर हजर राहायला हव्या. त्या क्षेत्रात प्रत्यक्ष काम करणाऱ्या अधिकारी व्यक्तींना आलेले अनुभव व त्यांतील खाचखळगे त्यांनी लिखित स्वरूपात समाजासमोर ठेवलेले असल्याने सांस्कृतिक संबंधांची काळजी करणाऱ्या विचारवंतांना त्यात बरेचसे खाद्य मिळणारे आहे.

महाराष्ट्रात मधून मधून बुद्धिनिष्ठांचे मेळावे भरले जातात. त्यांच्या विचारमंथनाचे निश्चित स्वरूप खरं म्हणजे लिखित स्वरूपात नवभारत-सारख्या संस्कृति-प्रधान विचारांना वाहिलेल्या कालिकांतून किंवा महाराष्ट्र टाईम्ससारख्या पुरोगामी विचारांचे सार-संकलन तत्परतेने देणाऱ्या दैनिकांतून यायला हवे होते. श्री. ना. ग. गोरे यांचा 'भ्रष्टाचार शिष्टाचार' बनत असल्याचा एक मार्मिक लेख धर्मयुगमधून वाचनात आला. 'आलोचना'सारख्या कालिकांतूनही साहित्याखेरीज सांस्कृतिक पातळीवरचे वैचारिक आलोडन करणारे लेखन यायला हवे. 'परिक्रमा' सारखे एक नमुनेदार सदर चालविणारे श्री. राम पटवर्धन यांच्या सम्पादनाखाली नेटाने चाललेले 'सत्यकथा' मासिक बंद पडल्याने पुरोगामी लेखणीला एकप्रकारचा आळाच बसत आहे की काय अशी साधार शंका येऊ लागली आहे. ही सारी पार्श्वभूमी लक्षात घेऊनही महाराष्ट्रातील बुद्धिनिष्ठांपुढे पुढील प्रश्न विचारार्थ ठेवीत आहे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

१) प्रचलित शिक्षणपद्धतीतून केवळ कारकून तयार केले जातात. त्या पद्धतीत मूलतः फरक व्हावा असे सर्वच शिक्षणतज्ज्ञांना वाटते. हा फरक कोणत्या पद्धतीचा असावा ? विद्यार्जनाचे मूलतत्त्व काय असावे ? ज्ञान म्हणजे काय अन् ज्ञानार्जन करायचे म्हणजे नेमके काय करायचे? त्या ज्ञानाचा जीवनोपयोगी अर्थार्जनाशी किंवा वस्तु-उत्पादनाशी संबंध कशा प्रकारचा असावा? तांत्रिक शिक्षणाशिवाय आजच्या राष्ट्रीय शिक्षणाला अर्थ राहणार की नाही ? महात्माजींचा मूलोद्योगविषयक शिक्षणक्रम कितपत व्यवहार्य आहे ? शिक्षणपद्धतीचे मूल्यांकन कोणत्या तत्त्वाने करायचे ?

२) आजचा कारखानदार फायद्याकडे नजर ठेवून आपल्या मालाची किंमत ठरवतो. राजकीय पक्ष सरकार आपल्या ताब्यात कसे येईल याकडे लक्ष ठेवून आपली धोरणे आखतात. साहित्यिक आपले वाङ्‌मय लोकांत अधिक प्रसृत कसे होईल याकडे लक्ष ठेवून लिहितात. सांस्कृतिक व सामाजिक मूल्यांची जोपासना कुणी करायची ? कालची सामाजिक नीतिमूल्ये आज वापरात नसतील तर नवजीवनाच्या पार्श्वभूमीवर त्यांचा आराखडा कसा मांडता येईल ?

३) धार्मिक संस्थांनी सध्याचं बदलतं सामाजिक जीवन लक्षात घेऊन आचार-विचार-उच्चारांच्या बाबतीत कोणत्या धोरणाचा पुरस्कार करणं इष्ट आहे ? बुद्धिवाद्यांच्या मते धर्म ही संस्था कालबाह्य झाली असेल तर धर्म मानणाऱ्यांसाठी त्यांचा पवित्रा काय राहील? व्यक्तिस्वातंत्र्याचा उदो उदो केल्याने व्यक्तिहित व समाजहित यांत बेबनाव आल्यास कुणाचं हित अधिक प्रबल समजायचे ?

४) भिन्न भिन्न आचारविचारांनी गजबजलेल्या भारतीय जीवनात 'भारतीय संस्कृती' नावाच्या वस्तूचा गेल्या पन्नास वर्षांत बराच प्रचार व प्रसार चालू झाला. 'भारतीय संस्कृति कोश' नावाचा संदर्भग्रंथही जागृत अस्मितेने घडवला... 'भारतीय विद्या' (Indology) नावाची विद्याशालाही प्रचलित झाली. 'भारतीय विद्याभवन' नावाची उच्चभ्रू लोकांची एक संपन्न संस्थाही समाजात वावरत आहे... मात्र ही संस्कृती वा विद्या– समाजाच्या मूळ थरापर्यंत पोचलेली दिसत नाही. किंबहुना शहरी–नागरी जीवन व खेडवळ–ग्रामीण जीवन यांतील तफावत वाढतच चालली आहे. प्रांताप्रांतांमधील भाषांच्या आधारे भाषिक अस्मिता आणि गुर्मी राजकीय कारणांसाठी वाढीला लागली आहे. राजकीय पक्षांचे सांगणे वेगळे आणि वागणे वेगळे झाल्याने समाज रोगग्रस्त झाला आहे. (आजचा बुद्धिजीवी वर्ग स्किझोफ्रेनिया नावाच्या रोगाने ग्रासला आहे असे एकदा प्रसिद्ध पुरोगामी समाजवादी विचारवंत श्री. एस्. एम्. जोशी यांनी व्याख्यानात सांगितलेले आठवावे). या स्थितीतून मुक्त होण्यासाठी बुद्धिवादी मंडळी कोणता मार्ग सुचवतात ?

५) या संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर आणखी एका मुद्द्याचा विचार व्हावयास हवा. कॉलेजच्या वर्तुळात तरुणवर्गाचा एक हासी-खुशीचा किंवा टर उडविण्याचा एक किस्सा असा : 'सध्या आम्ही 'घर' नावाच्या खाणावळीत जीवन व्यतीत करीत आहोत. आम्हाला अस्तित्व कुठे आहे ?... आम्हाला हवे तसे थोडेच वागता येते ?' – हा झाला तरुणांचा विचार. त्यांचे पालक म्हणतात, 'आजचा तरुण वर्ग उद्दाम आहे. त्याची कशावरच भिस्त नाही. तो कशाचीही पर्वा करीत नाही...' वगैरे.

या दोन्ही विचारदिशांचा सुवर्णमध्य गाठावयाचा तर त्यासाठी काही प्रत्यक्ष कार्य करावयास हवे काय ? हवे असल्यास त्या कार्याची रूपरेषा कोणती ? ... सध्या परदेशांशी संबंध अधिक सुकर झाल्याने परदेशातील विचारांचे वारे दूरदर्शन-सिनेमा-वृत्तपत्र आदिद्वारा या देशात येतच राहणार. त्यांचा परिणाम प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे येथील तरुण पिढीवर पडत राहिलाच आहे आणि तो राहणारही आहे. अशा स्थितीत संस्कृतिसंरक्षकांनी आपली धोरणे बदलावयास हवी असतील तर तर त्याचे स्वरूप काय ?

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

६) सुप्रीम कोर्टात एक घटना घडली. एक महिला कर्मचारी आधुनिक वेषभूषा करून कामावर आली. तिला कोर्टाकडून आपला ड्रेस बदलून येण्याची समज देण्यात आली. प्रश्न असा : कायदेतज्ज्ञांनी सध्याच्या प्रचलित कायदे-कानूंच्या चाकोरीतूनच आपले कामकाज चाल-वावयाचे की सामाजिक हित लक्षात घेऊन कायद्यांचे विश्लेषण ( Interpretation ) करावयाचे ? सामाजिक हित, व्यक्तिगत स्वातंत्र्य, राजकीय पक्षांची मतमतांतरे, कायदे कानूंची परिवलये यांत परस्पर विरोध निर्माण झाल्यास कायदेतज्ज्ञांनी कोणत्या मूल्यांना अधिक महत्त्व द्यावे ? या सन्दर्भात 'भारतीय संस्कृती' नावाची वास्तविक वस्तू गृहीत धरल्यास तिचे स्वरूप काय असेल ?

७) सार्वजनिक संस्थांचा कारभार समाजाची एक विवक्षित बांधीलकी लक्षात घेऊन आखला जातो... सामाजिक जीवन व व्यक्तिगत जीवन यांच्या परस्पर संबंधांत बरीच मतमतांतरे असतात. व्यक्तिगत विचार बाजूला सारून 'बहुजन हिताय बहुजन सुखाय' व्यवहार आखावे लागतात. पण प्रत्यक्षात– विशेषतः सरकारी-निमसरकारी-नगरपालिका-ग्रामपंचायती ... इ. ठिकाणी– एका व्यक्तीच्या विचारांचेच प्रायः प्राबल्य दिसून येते. पुढच्या पंचवीस वर्षांत या स्थितीत काही विशेष फरक पडणार नाही असे सांगता येणार नाही. तो फरक कशा स्वरूपाचा व्हावा याची पूर्वपीठिका बुद्धिवादी विचारसरणीच्या लोकांनी ठीक करायला हवी आहे काय ? हवी असेल तर तिचे स्वरूप काय ?

८) नागरी जीवनात– विशेषतः नागरी कारभारात एका विशिष्ट शिस्तीची अपेक्षा असते. ती शिस्त एकदा बिघडली, की उत्कृष्ट कारभार हाकलणारालाही तो व्यवस्थितपणे आखता येणे शक्य नाही. लाचलुचपत, संप, भ्रष्टाचार, घूसखोरीसारखे प्रकार प्रचंड प्रमाणात या कारभारात घुसले आहेत असे सारेच लोक मानतात. ज्यांना जे जमते ते करण्यास कुणी कचरत नाहीत. मिळतो तो चोर, बाकी शिरजोर ! अशी स्थिती आहे. ही 'अधोऽधो चाललेली गंगा' शेवटी कुठं जाऊन मिळायची आहे कुणास ठाऊक ! भर्तृहरीने तर 'विवेक-भ्रष्टानां भवति विनिपातः शतविधः' असे वैतागून म्हटले होते. म्हणजे या प्रकाराला ऐतिहासिक सत्यता आहे. गेल्या हजार दीड हजार वर्षांत हा भारतीय समाज, समाज म्हणून टिकला आहे. या पुढेही तो टिकेलच. मात्र विचारवंतांना त्याची निष्कारण विशेष काळजी वाटू लागली आहे ... तुम्हालाही त्याची चिन्ता वाटते काय ? मग तुमच्या मते नागरी जीवन सुधारण्याचे उपाय कोणते ?



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

THE SANGLI BANK LTD.

Offers all types of Banking Services through it's network of Branches in Maharashtra, Karnatak, Gujarath, Tamilnadu, Goa and Andhra Pradesh

More than 64 years in Banking Service

A PARTNER IN YOUR PROSPERITY

The Sangli Bank Ltd.



Registered Office :

RAJWADA CHOWK, SANGLI
(Maharashtra)

M. S. APTE
Chairman




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## ग्रंथ-परीक्षण

वाळूचे किल्ले (कवितासंग्रह)– सदानंद मोरे, मेहता पब्लिशिंग हाऊस, १२२६ सदाशिव पेठ, पुणे; किं. ८ रुपये.

'वाळूचे किल्ले' हा सदानंद मोरे यांचा पहिला कवितासंग्रह. साहित्य संस्कृती मंडळाच्या अनुदानाने 'मेहता पब्लिशिंग हाऊस'ने प्रकाशित केलेला. कवितासंग्रहाला शांता शेळके यांची तीन साडेतीन पानांची प्रस्तावना आहे. उरलेल्या पस्तीस पानांत नव्वदहून अधिक कविता आहेत, इतकेच नव्हे तर या पस्तीस पानांवरही पानाच्या जितक्या भागावर कविता छापल्या आहेत तितकाच भाग कोरा आहे! हे सांगण्याचे कारण– या कविता इतक्या लहान आहेत की यांतील जास्तीत जास्त कविता म्हणजे, केवळ एक कल्पना मांडणारे वाक्य(?) आहेत.

या कवितासंग्रहातील एकूणच कविता या प्रेम-कविता (अपवाद फक्त एक– 'कोसळणारे आकाश सावरणारे हात हवेत!') आहेत तरी त्या इतक्या एकसुरी आहेत, की अनेकदा आपण एकच कविता पुन्हा पुन्हा वाचतो आहोत असे वाटते. (त्यामुळेच की काय 'दिल्या घेतल्या वचनांचा हिशेब आता मांडू नकोस' ही एकच कविता पृष्ठ क्र. ४२ वर दोनदा छापली आहे तरी ते लक्षात आलेले नाही.) किंबहुना यातील अनेक छोट्या छोट्या कविता अशा आहेत, की त्यांची विशिष्ट क्रमाने मांडणी केल्यास एकच कविता आकारेल असे वाटते.

बऱ्याच कवितांची रचना उर्दू शेरसदृश असून कवीने अशी रचना जाणीवपूर्वकच केली आहे असे गालिब, उमरखय्याम यांच्या उल्लेखांवरून वाटते. अनेक कविता गद्यसदृश आहेत. रचनाचमत्कृतीच्या हव्यासापायीच हे दोष तिच्यात आले आहेत.

"कुणाच्या वाट्याला काय येते
कुणाच्या वाट्याला काय!
पण तुझी वाट पहाणं देखील
माझ्या वाट्याला आलं नाही" किंवा–

"तुझी गाडी आली
आणि तू निघून गेलीस
मी मात्र होतो तिथंच राहिलो
–होतो तसाच"

अशी कितीतरी गद्यनिवेदने आढळतात. केवळ रचनाचमत्कृतीच्या दृष्टिकोनातून विचार केला तरी वैशिष्ट्यपूर्ण, थक्क करील असा रचनाप्रकारही यात कुठेच नाही. चमत्कृतीचा हव्यास, एखाद्या शब्दाचा किंवा कल्पनेचा मोह कवितेची खोलीच कशी नाहीशी करून टाकतो हे या कविता वाचताना अनेकदा जाणवते.

"मला प्रेझेंट देण्याचा
तुझा हट्टच असेल
तर एक साधं कॅलेंडर दे
ज्यात मला माझे
हरवलेले दिवस सापडतील"

हे एक गद्यवाक्य तर आहेच शिवाय यातील कल्पनाही अगदी सामान्य आहे. अशा सामान्य कल्पनाही या कवितांत अनेक आहेत.

यातील कित्येक कविता अचूक शब्दयोजनेच्या अभावी बिघडल्या आहेत. प्रियकर-प्रेयसी एक-मेकांच्या पावलांचा मागोवा घेत चाललेली असताना त्यांच्या पायाला अचानक होणारा 'पक्षघात' खटकतो.' आयुष्याचा पंचनामा करणे' हा वाक्-प्रचार तर या प्रेमकवितेत अगदीच विसंगत वाटतो. अभिमन्यूच्या हुंकाराचे 'इनोसंट' हे विशेषण एका वेगळ्या अर्थाने पण असेच विसंगत वाटते.

मात्र यांतील– 'तिरकी नजर, तिरपी मान', 'विषुववृत्तावरील घर,' 'मी इथे आणि तू तिथे– क्षितिजापलीकडे', 'तू तू कुठे राहिली होतीस मीच झाली होतीस' या आणि प्रेयसीच्या रूपाचे, स्पर्शाचे वर्णन करणाऱ्या कविता नक्कीच चांगल्या जमल्या आहेत. थोडक्यात हा कवी उर्दू शेरांच्या अनुकरणातून बाहेर पडून स्वतःच्या मराठी कवितेत जेव्हा बोलू लागतो तेव्हा खरेच कविता जन्म घेते. पण कवीला हा चमत्कृतीचा मोह का आहे हे मात्र कळत नाही. सदानंद मोरे यांनी आपले बल-स्थान ओळखल्यास त्यांच्या पुढील कवितासंग्रहा-बाबत आशा आहे.

× × ×







अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**पावसाळा (कवितासंग्रह)**– नितीन तेंडुलकर, असस प्रकाशन, ७ उषःकाल, साहित्यसहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–५१; १९८२; पृ. ५०; किंमत १० रुपये.

'पावसाळा' हा नितीन तेंडुलकर यांचा कवितासंग्रहही साहित्य संस्कृती मंडळाच्या अनुदानाने, असस प्रकाशनाने प्रकाशित केलेला पहिला कवितासंग्रह आहे. मात्र सुभाष अवचटांच्या मुखपृष्ठापासून ते मौजेच्या सुबक छपाईपर्यंत तो पुस्तक म्हणून कुठेही बिघडलेला नाही. या नवीन कवीच्या कवितांबाबत थोडे सविस्तर बोलणेच उचित ठरेल.

या कवितासंग्रहाला विंदा करंदीकरांचे पत्ररूपी आशीर्वाद लाभले आहेत. करंदीकरांनी आपल्या पत्रात तेंडुलकरांचा 'जातिवंत कवी' असा उल्लेख केला आहे. कवितासंग्रहातील पन्नास कविता वाचल्या की याचे कारण समजते ते असे– एक म्हणजे हा कवी वाङ्मयातील कोणत्याही लाटेचा आश्रय न घेता स्वतंत्रपणे आपले भावविश्व फुलवितो–

'नाईलाजानेच तो स्वतःकडे वळला
आत्मसुखासाठी
आणि त्याने स्वतःचीच मशागत सुरू केली'

हे कवीचे निवेदन त्याच्या कवितांबाबतही खरे आहे.

आणि दुसरे म्हणजे आशय वा अभिव्यक्तीच्याबाबतीत सहज डोळ्यांत भरेल अशी उसनवारी तेंडुलकरांनी केलेली नाही.

या संग्रहातील बऱ्याच कविता (सर्व नव्हेत) या प्रेमकविता असून बऱ्याच प्रेमकवितांमागची कवीची भूमिका सारखीच आहे. विरहानंतर येणाऱ्या प्रेयसीच्या आठवणींतून बऱ्याच कवितांचा जन्म झाला आहे. त्यामुळे कवी 'अश्रूंच्या महाप्रलयात उद्ध्वस्त' झालेला आहे. आणि तरीही–

'तुझ्या परत परत येण्याने
मला मृत्यूही येईनासा झालाय.'

अशी त्याची अवस्था झाली आहे. कवीच्या जीवनात आता फक्त अंधारच अंधार भरून राहिला आहे.

'उत्सव आज प्राणात भिनले
दिवे कधीच काळोख झाले.'

आणि जो उजेड आहे तोही–

'सगळी कहाणीच संपून जावी तसा उजेड'.

कवीने डाव रंगात येण्याआधीच सर्व स्वप्नांना घराबाहेर हकलले आहे. आणि आता–

'आणि अंधार शिलगावून
उभी रात्र जागलो डोळ्यांनी'

असे त्याचे जगणे सुरू झाले आहे.

कवीच्या बागेतील फुलांचा बहर ओसरला आहे. मनात काळे ढग जमले आहेत. डोळ्यांचा 'पावसाळा' होऊ बघतो आहे. आणि शेवटी–

'रडून रडून हलक्या झालेल्या
आभाळात तेव्हा
पुन्हा तुझ्याच स्वप्नांचे इंद्रधनुष्य
पडलेले असते.'

असा प्रत्यय त्याला येतो आहे.

या कवितांपैकी 'बागेची सवय' सारखी कविता तर कवी आपले दुःख आता विसरू लागला आहे, 'बाग पुन्हा फुलू पहातेय' असा आशय व्यक्त करणारी आहे. एकूण, प्रेम– प्रेयसीचा विरह– आठवणी–आणि पुन्हा नवे प्रेम असा सामान्य पातळीवरून होणारा कविमनाचा प्रवाह येथे आहे.

यात केवळ प्रेमकविताच नाहीत; तर 'दृश्य', 'झाड : एक आडवा छेद', 'स्वातंत्र्याची मध्यवर्ती कल्पना' यांसारख्या आजूबाजूच्या वास्तवाची जाणीव असलेल्या कविताही आहेत. कधी एखाद्या कवितेतून गर्दीत जाणवणारे एकटेपणही आले आहे. 'सैतान' सारखी एखादी पहिलीवहिली कविता रचनेतच नवेपणाची स्पष्ट जाणीव देऊन जाते.

प्रतिमांच्या माध्यमातून बोलणारा हा कवी रसिकमनाचा तळ मात्र ढवळू शकत नाही. वेदनेचाच शब्द होण्याऐवजी शब्द अखेर शब्दच राहिले आहेत. मात्र भविष्यात हे जमेल अशी आशा वाटण्याइतक्या या कविता नक्कीच जमल्या आहेत. म्हणूनच करंदीकराना तेंडुलकर 'जातिवंत कवी' वाटले असावेत.

– टी. आर. भोसले

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## वाचकांचा पत्रव्यवहार

संपादक 'नवभारत' यांस स. न.

डॉ. म. अ. मेहेंदळेंनी महाभारतावरील त्यांच्या लेखात खांडवदाह, सौप्तिककंदन व यादवी या तीन घटनांना कारणीभूत नियतीचा दंड असल्याची व्यासांची धारणा आहे, हे त्यांनी केलेले विवेचन महाभारताच्या अभ्यासाला मौलिक योगदान आहे असे माझे मत आहे. हे मत मी माझ्या 'महाभारतातील नियति व आयति' (नवभारत, फेब्रु. ८३) या लेखात सुरुवातीलाच नमूद केलेले आहे. माझा आक्षेप हा आहे की, ते स्वतः २० व्या शतकात ख्रिस्तपूर्व ९ व्या शतकातील व्यासांची नियतिवादी (fatalism) धारणा प्रमाणभूत मानतात. व्यासांचा दार्शनिक दृष्टिकोन सांगणे वेगळे आणि इतिहासज्ञाने तो स्वतःचा दार्शनिक दृष्टिकोन मानणे वेगळे.

त्यांचा नियतिवादी दृष्टिकोन इतरांनी स्वीकारावा असा आग्रह ते धरीत नाहीत यावरून ते अनाग्रही वाटतात. पण, माझा बहुप्रवाहात्मक ऐतिहासिक भौतिकवादी दृष्टिकोन स्वीकारू नये असाही आग्रह ते धरतात. माझा दृष्टिकोनच महाभारताच्या या तीन घटनांचे आंतरिक सूत्र उलगडून दाखवू शकतो हे मी त्यांच्या नियतिवादी दृष्टिकोनाचे सप्रमाण खंडन करून सिद्ध केलेले आहे. ही प्रमाणे खोडून काढली तरच आपला नियतिवादाचा आग्रह संयुक्तिक असल्याचे डॉ. मेहेंदळे सिद्ध करू शकतात. तसे ते जोपर्यंत करीत नाहीत तोपर्यंत माझा अर्थ स्वीकारार्ह नसल्याचा त्यांचा आग्रह नकारात्मकच राहील.

नवभारताच्या मे ८३ अंकातील माझ्या लेखात मी डॉ. मेहेंदळेंच्या निर्ऋतिविषयक दृष्टिकोनाचे खंडन केले आहे. निर्ऋतिविषयक त्यांच्या दृष्टिकोनाचा मुख्य आधार आहे निर् + ऋति मधील ऋति हा शब्द ऋत शब्दाहून वेगळा आहे हे त्यांचे प्रतिपादन. निघण्टु व निरुक्त यांत ऋति हा शब्द नाही. हा ऋति शब्द ऋतहून वेगळा करून त्याचे अर्थ ऋतहून वेगळे लावायची प्रथा निरुक्तोत्तर काळातील आहे. म्हणून, डॉ. मेहेंदळधांचा हा आधार प्रमाणभूत मानला जाऊ शकत नाही. खरा प्रश्न विचारला पाहिजे तो हा की, ऋति हा शब्द ऋतपासून बनलेला आहे की ऋत हा शब्द ऋतिपासून बनलेला आहे. याचे निर्णायक उत्तर आपल्याला वेदांतच मिळते. ऋग्वेदाच्या १०.१६५ या सूक्ताचा ऋषि कपोत नैर्ऋत आहे. कपोत हा पक्षी निर्ऋति देवतेचा दूत (दूतः निर्ऋत्याः) असल्याचे या सूक्ताची पहिली ऋचा म्हणते. हे सूक्त कपोतशांतिसूक्त असल्याचे महामहोपाध्याय सिद्धेश्वरशास्त्री चित्राव त्यांच्या 'ऋग्वेदाचे मराठी भाषांतर' या ग्रंथात (पा. ७२२) सांगतात. नैर्ऋत हा निर्ऋतीचा ऋत्विज् होता हे उघड आहे. कपोतशांति कपोत नाव असणारा ऋत्विज्च करू शकत होता. Like cures like या होमिओपाथीच्या मूलतत्त्वाप्रमाणे ही होमिओपॅथिक माया (magic) आहे !

कवष ऐलूष हा १०.३०.३४ या महत्त्वपूर्ण ऋग्वेदीय सूक्तांचा ऋषि मातृनामी होता, ऐलूषीपुत्र होता. ऐतरेय ब्राह्मणाचा कर्ता महिदास ऐतरेय हा इतरा नावाच्या स्त्रीचा पुत्र होता असे शंकराचार्य सांगतात- 'इतराया अपत्यम् ऐतरेयः।' म्हणजे, कपोत नैर्ऋत हा निर्ऋतीचा पुत्र असला पाहिजे हे उघड आहे. निर्ऋती म्हणजे निर्ऋतिपुत्री दुर्गा वा राष्ट्रीदेवी वाक्. १०.१२६ या ऋग्वेदीय सूक्ताची ऋषि वाक् आम्भृणी आहे. वाक् ही आम्भृण नावाच्या पुरुषाची कन्या असण्याऐवजी अम्भिणी नावाच्या स्त्रीची कन्या असणे जास्त संयुक्तिक आहे. भौम, भौमासूर हे शब्द भूमि या शब्दावरून बनलेले आहेत. खुद्द शंकराचार्यांनाही म्हणावे लागते की– 'स्त्रीप्राधान्याद् गुणवान् पुत्री भवति।' रामायण–महाभारतात यक्ष, राक्षस, असुर, इ. अनार्य गणांना नैर्ऋत्य म्हटलेले आहे. नैर्ऋत्य म्हणजे निर्ऋतीच्या गणाची अपत्ये. यावरून ऋत हा शब्द ऋति या शब्दावरून बनलेला असला पाहिजे हे उघड आहे. नियतीच्या दंडाचे विवरण करणारा लेख नियति,









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दैव व दिष्ट या पर्यायाची शब्दांच्या व्युत्पत्तीत व इतिहासात जात नाही हे कितपत समर्थनीय आहे ?

डॉ. मेहेंदळे म्हणतात, की निघण्टु अनुसार केवळ ऋतचा अर्थ पाणी होतो; निर्ऋतीचा नाही. त्यामुळे निर्ऋति ही अप्सरस् वा नदीदेवता असू शकत नव्हती. आयुर्वेदाची उत्पत्ती अथर्ववेदापासून झाली, असे सर्वसामान्यपणे मानण्यात येते. आयुर्वेदाचा सर्वांत प्रमाणभूत ग्रंथ चरकसंहिता. भिषग्वर्यांच्या एका मेळाव्यात राजर्षि वार्योविद खालील श्लोक म्हणतो ( १.२५.१३ ) –

रसजानि तु भूतानि व्याधयः पृथग्विधाः ।
आपः हि रसवत्यः ताः स्मृताः निर्ऋतिहेतवः ।।

अर्थ होतो : सर्व भूते ( प्राणिमात्र ) रसापासून जन्मतात. तसेच सर्व रोग. पण रस पाण्यापासून बनलेले आहेत. म्हणून सर्व प्राणिमात्र व रोग पाण्यापासून ( निर्ऋति ) झाल्याचे लक्षात ठेवले पाहिजे.

त्यावरून आयुर्वेदाच्या परंपरेत निर्ऋतीचा अर्थ पाणी होत होता, हे सिद्ध होते !

– शरद् पाटील

---


नवे महत्त्वपूर्ण प्राज्ञ प्रकाशन !

भारतीय दासप्रथा व सामंतप्रथा आणि त्यांची तत्त्वज्ञाने यांच्या उगमांची अन्वीक्षा करणारा ग्रंथ

**दास-शूद्रांची गुलामगिरी**

( खंड १, भाग १ )

लेखक : शरद् पाटील

पृष्ठे : डेमी ५०६ किंमत : २५ रुपये टपाल खर्च : ५ रुपये

– संपर्कासाठी पत्ता –

चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ,
३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३
( जि. सातारा )


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सार-संकलन

## माय थेरेसा यांचे हिंदू धर्माला सर्टिफिकेट

आज भारतात आणि जगात ज्यांचे अतोनात तथापि सकारण कौतुक होत आहे अशा व्यक्तींमध्ये माय थेरेसा यांचा क्रमांक बराच वर लागेल. त्यांचे नाव उच्चारताच भारतीयांना ज्याप्रमाणे ज्यांच्या एकनिष्ठ सेवेला त्यांनी आजन्म वाहून घेतले आहे ते ' गरिबांतले गरीब ' आठवतील त्याचप्रमाणे गांधीजीही आठवतील. कारण गांधीजींना जे कधी मिळाले नाही ते नोबेल शांतता पारितोषिक त्यांना (आणि हेन्री किसिंजर यांना) मिळाले आहे. माय थेरेसा आता भारतीय आहेत. त्या मूळच्या अल्बेनियन आणि त्यांचा जन्म युगोस्लाव्हियातील. म्हणजे कातडीने गोऱ्या. त्यांच्यांचसारख्या दुसऱ्या एखाद्या सेवाव्रती भारतीयाचा निर्देश करायचा तर शिवाजीराव पटवर्धनांचे नाव घेता येईल. त्यांनीसुद्धा आजन्म कुष्ठरोग्यांची सेवा केली आहे. पण त्यांचे नाव कधी वर्तमानपत्रांत झळकत नाही. मंत्री आणि सरकारी अधिकारी यांना सरळ करण्यासाठी जेव्हा ते उपोषण करायला बसतात तेव्हाची गोष्ट वेगळी. माय थेरेसा अत्यंत गरिबीचे जीवन जगतात. त्यांच्या रोजच्या आहारावर होणारा खर्च रु. १.५० पेक्षा अधिक नसतो. पण गेल्या वर्षी त्यांनी विमानातून ५०,००० मैल प्रवास केला. विमानांची तिकिटे त्यांना विमानकंपन्यांकडून भेटीदाखल मिळाली होती. ह्या प्रवासातून त्यांनी प्रेमाचा संदेश जगभर पसरविला.

तेव्हा संतपणा परिणामकारक ठरण्यासाठी गोरी कातडी, रोमन कॅथलिक चर्चसारख्या जगड्व्याळ, संपन्न, शेकडो वर्षे जगाच्या राजकारणात मुरलेल्या संघटनेचा आधार, प्रसारमाध्यमांचा योग्य तो उपयोग करण्याचे कौशल्य ह्या गोष्टींची जोड पोषक ठरते.

माय थेरेसा वृत्तीने अर्थात धार्मिक आहेत. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे जेव्हा त्या गरिबांची सेवा करतात तेव्हा, ' गरिबांना स्पर्श करताना आम्ही ख्रिस्ताच्या शरीराला प्रत्यक्षात स्पर्श करीत असतो. गरिबांना खाऊ घालताना आम्ही ख्रिस्ताला खाऊ घालीत असतो, आम्ही उघड्या ख्रिस्ताचे अंग वस्त्राने झाकत असतो, अनिकेत ख्रिस्ताला आम्ही आसरा देत असतो. ' देव सर्वांचा आहे पण ख्रिस्त फक्त ख्रिश्चनांचा आहे. बुद्ध, कबीर, तुकाराम यांच्याप्रमाणे जीझसही सर्वांचा होऊ शकेल; पण सर्वजण रोमन कॅथलिक पंथी ख्रिश्चन झाल्याशिवाय रोमन कॅथलिक चर्चचा ख्रिस्त सर्वांचा ख्रिस्त होऊ शकणार नाही. माय थेरेसांच्या ' मिशनरीज ऑफ चॅरिटी ' ह्या संघटनेत कॅथलिक पंथीयांशिवाय इतरांना प्रवेश नाही. संघटनेने स्वीकारलेले धर्मशास्त्र व कार्यपद्धती ही चोखपणे चर्चने अधिकृतपणे स्वीकारलेल्या नियमांना अनुसरणारी आहे. ह्या नियमांत फेरबदल करण्याची त्यांना काही आवश्यकता वाटत नाही. 'चर्चच्या हातून काही गैरकृत्य होणे शक्य आहे का?' असा प्रश्न त्यांना विचारला असता, ' जोपर्यंत चर्च देवाच्या बाजूचे असते तोपर्यंत चर्चच्या हातून काही गैर होणार नाही ' असे उत्तर त्यांनी दिले. अर्थात देवाची बाजू कोणती हे ठरविण्याचा अधिकार चर्चचाच आहे. गॅलिलिओच्या चौकशीच्या वेळी तुम्ही चर्चची बाजू घेतली असती की आधुनिक ज्योतिष्शास्त्राची ह्या प्रश्नाचे त्यांनी हसत दिलेले उत्तर ' चर्चची ' असे होते.

गरिबांची सेवा करताना त्या जात, धर्म, राष्ट्र असे भेद मानत नाहीत. अलीकडे त्यांनी नेलीला भेट दिली आणि तेथे झालेल्या हत्याकांडात अनाथ झालेल्या अर्भकांना अपार मायेने पोटाशी धरले. ही अर्भके धर्माने मुसलमान होती (म्हणजे त्यांचे आईबाप मुसलमान असणार). ' अखिल आसाम इस्लामी मंडळ ' ह्या संस्थेने त्यांना लिहिल्यामुळे त्या तेथे गेल्या होत्या. माय थेरेसा यांना जेव्हा असे सांगण्यात आले, की " आसामातील काही मुसलमानांना असे वाटते की तुम्ही त्यांच्या बाजूने उभ्या आहात. तुम्ही अलीकडे बैरुटमध्ये बेघर झालेल्या मुस्लिम मुलांना वाचविले त्याचा उल्लेख

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ते करतात" तेव्हा त्यांनी असे निक्षून सांगितले, की "ही मुले मुसलमान होती हे ह्याचे कारण नाही. ही गोष्ट समजून घेण्याचा तुम्ही प्रयत्न करा. बैरुट असो, आसाम असो, ही ईश्वराची लेकरे आहेत."

(पूर्वीच्या) पूर्व पाकिस्तानात अनेकदा हिंदूंचे शिरकाण करण्याचे प्रयत्न झाले आणि बेघर झालेल्या हिंदूंचे लोंढे भारतात आले. माय थेरेसा तेव्हा पूर्व पाकिस्तानात जाऊ शकल्या नाहीत. किंवा आज इराणमध्ये अनेक कारणांमुळे लहान मुले अनाथ होत आहेत. पण तेथेही माय थेरेसा पोचल्या नाहीत. हीसुद्धा ईश्वराची लेकरे असणार. कोणत्याही कारणामुळे ईश्वराच्या लेकरांत माय थेरेसा भेदभाव करतील अशी सुतराम शक्यता नाही. पण संतांनासुद्धा व्यावहारिक तारतम्य पाळावे लागत असेल. कोणते सरकार ईश्वराच्या लेकरांची सेवा करायला प्रतिबंध करेल आणि कोणते करणार नाही याचे भान राखावे लागत असेल. गांधीजींना हे भान नसे. त्याचे प्रायश्चित्त त्यांनी भोगले.

माय थेरेसा ह्यांना भारतात परस्परांविषयीच्या प्रेमाची, आस्थेची उणीव दिसते. त्यांचे म्हणणे असे आहे : 'भारत हा माझा देश आहे आणि मी भारतीय आहे. पण आपण हे मान्य करू या की भारतात दुःखद ठरावी एवढ्या प्रमाणावर परस्पराविषयीचे प्रेम व आस्था ह्यांची उणीव आहे. पण याचा हिंदू धर्माशी काही संबंध असेल अशी क्षणभरही शंका वाटलेली नाही. तुम्ही प्रेम करू नका असे कोणताही धर्म तुम्हाला सांगत नाही. कोणताही धर्म क्रौर्याची, मानवी दुःखाविषयी अनास्था बाळगण्याची, नास्तिकतेची शिकवण देत नाही. पण देशात जो प्रेमाचा अभाव आहे त्याचा भारतातील जातिव्यवस्थेशी काही संबंध पोचतो, असे मला वाटते."

सर्वसामान्य भारतीयांना यावर अशी शंका वाटेल, की जेथे जातिव्यवस्थेचा स्पर्शही नाही त्या इराणमध्ये, कम्बोडिया–व्हिएतनाममध्ये, दक्षिण अमेरिकेतील राज्यांत, आशिया–आफ्रिकेतील समाजांची तीन शतके निर्घृणपणे पिळणूक करून त्यांचा विध्वंस करणाऱ्या युरोपीय राष्ट्रांत, अणु–युद्धाची तयारी करण्यात दंग असलेल्या अमेरिका–रशियात प्रेमाचा पूर लोटला आहे किंवा होता असे दिसत नाही.

असो. व्यास–वाल्मीकी, ज्ञानेश्वर–तुकोबा यांचा हिंदू धर्म तुम्ही एकमेकांवर प्रेम करू नका असे माणसांना सांगत नाही, क्रौर्याची शिकवण देत नाही असे माय थेरेसा यांनी दिलेले सर्टिफिकेट, इंग्रजी कॉमिक्समधून रामायण–महाभारतातील कथा वाचणाऱ्या आणि झकपक 'कॉन्व्हेंट' शाळांत वाढणाऱ्या ह्या पिढीच्या हिंदूंना पुढेमागे उपयुक्त ठरेल. हे सर्टिफिकेट तसे पाहिले तर 'नकारी' आहे. हिंदू धर्मात काही चांगले आहे असे माय थेरेसा यानी म्हटलेले नाही. पण 'प्रेम करू नका, क्रौर्य करा' असे हिंदू धर्माने सांगितलेले नाही हे त्यांनी स्पष्टपणे आणि ठासून सांगितले आहे. भांबावलेल्या हिंदूंना ह्याचा उपयोग होईल.

माय थेरेसा यांच्या कार्यामुळे, तसेच निःस्वार्थपणे लोकांची सेवा करणाऱ्या इतर धार्मिक, अधार्मिक कार्यकर्त्यांमुळे देशातील प्रेमाची पातळी हळूहळू पण निश्चितपणे वाढत जाईल अशी आशा बाळगू या. पण माणूस जसा केवळ भाकरीवर जगत नाही तसा तो केवळ प्रेमावर जगत नाही. समाजाला आणि व्यक्तीला स्वाभिमानाचीही आवश्यकता असते. समाजाचा आणि व्यक्तीचा स्वाभिमान जागृत करणे हा गांधीजींचा मार्ग होता. जे मिशनरी इतर समाजांची स्वाभिमानाची गरज ओळखतील ते देणारे उरणार नाहीत, भाकरी देणारे नाहीत आणि प्रेमही देणारे नाहीत, ते सहकारी बनतील. हे नाते जोडणे, प्रेमाचे नाते जोडण्यापेक्षाही अधिक कठीण असते. जे मिशनरी भारतीयांशी हे नाते जोडण्यात यशस्वी होतात त्यांना तांत्रिक अर्थाने भारतीय बनावे लागत नाही. ते वेगळे राहूनही भारताशी एकात्मता साधतात. मग ते मिशनरीपणातून, एकमेव सद्धर्माचा प्रसार करण्याच्या, सर्वांना स्वतःसारखे बनविण्याच्या क्रूर जबाबदारीतून मोकळे होतात. स्वार्थाचे विसर्जन करून इतरांना केवळ प्रेम देण्याचा मार्ग खडतर आहे; पण समतेचा मार्ग त्याहूनही खडतर आहे. कारण स्वार्थाचे विसर्जन करण्यापेक्षाही अहंतेचे विसर्जन करणे अधिक कठीण आहे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## ऑस्ट्रेलियातील आदिवासींची स्थिती

चातुर्वर्ण्य आणि जातिव्यवस्था यांचा पुरस्कार करून हिंदू धर्माने सामाजिक विषमतेला प्रामाण्य दिले अशी टीका अनेकदा करण्यात येते व ती योग्यच आहे. हिंदुधर्माच्या तुलनेने इस्लाम व ख्रिश्चॅनिटी हे सामाजिक समतेला प्रोत्साहन देणारे धर्म आहेत असेही जोतिबा फुले यांच्यापासून मानण्यात आले आहे. हे मत कितपत साधार आहे हे इस्लामी आणि ख्रिस्ती समाजांत प्रत्यक्ष सामाजिक प्रथा कोणत्या आहेत व व्यवहार कसे चालतात हे पाहूनच ठरवावे लागेल.

ऑस्ट्रेलियन समाज हा ख्रिस्ती समाज आहे. आजचे सुशिक्षित ऑस्ट्रेलियन ख्रिस्ती धार्मिक सिद्धांतांवर कितपत विश्वास ठेवतात हा वेगळा प्रश्न आहे. ऑस्ट्रेलियात २ लक्ष आदिवासी आहेत. १७८८ मध्ये ब्रिटिश वसाहत तेथे स्थापन होण्यापूर्वी ते त्या देशाचे मालक होते. आज ते लोकसंख्येच्या एक टक्का एवढे आहेत. त्यांना समान नागरिक म्हणून मानण्यात व वागवण्यात येत नाही. सरकारी नियम काहीही असोत; प्रत्यक्षात आदिवासींना शाळा दुकाने, हॉटेले यांच्यांत वेगळे करण्यात येते. अनेक हॉटेलांत त्यांना प्रवेश देण्यात येत नाही. ग्रामीण विभागात दारू पिऊन बेभान झालेले गोरे लोक आदिवासींच्या वाड्यांतून बेछूटपणे गोळीबार करीत फिरतात. आदिवासी मेले तरी गोऱ्या लोकांना सहसा शिक्षा होत नाही. आदिवासी ही आपल्यासारखी माणसे आहेत हे मनापासून मान्य करायला गोरे लोक तयार नसतात ही ह्या सर्व परिस्थितीमागची मूळ अडचण आहे. अलीकडे एका गोऱ्या ऑस्ट्रेलियन माणसाच्या घरात एका आदिवासी अर्भकाचा देह त्यात मसाला भरून ठेवण्यात आल्याचे आढळून आले. पवित्र दफनभूमीमध्ये मृतांचे दफन करावे हा आदिवासींचा महत्त्वाचा संस्कार आहे. पण जेव्हा ह्या अर्भकाचे दफन करण्यासाठी ते आपल्या हवाली करावे अशी आदिवासींनी मागणी केली, तेव्हा ह्या गोऱ्या माणसाने ती अमान्य केली. आपण जमा केलेल्या कलाकृतींच्या संग्रहाचा तो भाग आहे असे त्याचे म्हणणे पडले.

ऑस्ट्रेलियातील नव्वद टक्के आदिवासी दारिद्र्यरेषेखाली जगतात. त्यांच्यांतून अजून एकही कॅबिनेट मंत्री झालेला नाही आणि फेडरल पार्लमेन्टचा सदस्य म्हणून आतापर्यंत एकच आदिवासी निवडून आला आहे. एकही आदिवासी डॉक्टर नाही व फारच थोडे वकील आहेत. अर्थात गोऱ्या लोकांची तक्रार अशी आहे की, आदिवासी आळशी असतात, शाळेतून लवकर गळतात आणि सरकारी मदतीवर —'डोल'वर—जगणे त्यांना पसंत असते. आदिवासी ज्या मानसिक वातावरणात वाढतो ते न्यूनगंडाने, असुरक्षिततेच्या भावनेने, गोऱ्या लोकांविषयीच्या भीतीने पछाडलेले असते ह्या गोष्टीकडे बऱ्याच गोऱ्यांचे ध्यान नसते. आदिवासी मुले सामान्यपणे शालेय शिक्षणही पुरे करू शकत नसल्यामुळे मोलमजुरीची कामे करून गुजराण केल्याविना त्यांना गत्यंतर नसते. आणि अनेकदा त्यांना मिळणारी मजुरी इतकी कमी असते, की त्यापेक्षा बेकार राहून सरकारी मदत घेणे त्यांच्या फायद्याचे ठरते.

ह्या दारिद्र्यामुळे त्यांच्यांत दारूचे व्यसन मोठ्या प्रमाणावर बोकाळलेले असते. गुन्हेगारीचे प्रमाणही खूप आहे. आदिवासी करीत असलेल्या मनुष्यवधासारख्या गुन्ह्यांचे प्रमाण राष्ट्रीय सरासरीच्या दसपट आहे. आदिवासींची लोकसंख्या जरी ऑस्ट्रेलियन लोकसंख्येच्या एक टक्का असली, तरी तुरुंगवास भोगीत असलेल्या कैद्यांत तीस टक्के आदिवासी असतात.

आदिवासींचे आरोग्य हीसुद्धा एक मोठ्या चिंतेची बाब आहे. गोऱ्या जमातीतून ज्या रोगांचे निर्मूलन झाले आहे असे अनेक रोग— उदा. महारोग— आदिवासी लोकांत पसरलेले आहेत. आदिवासींचे सरासरी आयुर्मान गोऱ्या लोकांच्या सरासरी आयुर्मानापेक्षा २० वर्षांनी कमी आहे आणि आदिवासींतील बालमृत्यूचे प्रमाण गोऱ्या लोकांच्या तुलनेने तिप्पट आहे. मधुमेह, आंधळेपण, रक्तदाब आणि लठ्ठपणा हे रोग ह्या जमातीत विशेषेकरून आढळतात. ह्या रोगराईचे मुख्य कारण आदिवासी ज्या परिसरात जगतात त्याच्याशी निगडित आहे. स्वच्छ पाण्याचा पुरवठा, सांडपाणी, मलमूत्र यांचा निचरा करण्याची कार्यक्षम व्यवस्था, हवा, उजेड खेळवणारी घरे आणि योग्य आहार ह्या गोष्टींवर सार्वजनिक आरोग्य उभारता येते आणि त्या आदिवासी जमातींना अभावानेच उपलब्ध असतात.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आदिवासींच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे जमिनीची मालकी. जमीन पवित्र आहे अशी आदिवासींची पारंपरिक समजूत आहे. प्रत्येक खडक व झाड हे आपल्या कोणातरी श्रेष्ठ पूर्वजाचे निवासस्थान आहे असे ते मानतात. ऑस्ट्रेलिया आणि क्वीन्सलँड या राज्यांत आदिवासींना अद्यापही जमीन बाळगता येत नाही. जागृत आदिवासींचे पक्के मत असे आहे, की "आमची जमीन आम्ही परत मिळविणे हाच आमचे सामर्थ्य व प्रतिष्ठा परत मिळविण्याचा एकमेव मार्ग आहे."

आदिवासींमधील जागृती वाढत आहे. त्यांच्या प्राचीन लोककलांचे आज जोमाने पुनरुज्जीवन होत आहे आणि गेल्या दोनशे वर्षांत गोऱ्या लोकांनी आदिवासींवर जी दडपशाही लादली आणि त्यांची जी पिळणूक केली त्याची जाणीव कलाकृतींच्या माध्यमातून लोकांमध्ये पसरविण्याच्या प्रयत्नांना वाढते यश मिळत आहे. आदिवासींच्या पुढाऱ्यांचे म्हणणे असे आहे, की ही अगदी समजण्यासारखी गोष्ट आहे. कारण "आमची सबंध संस्कृती म्हणजे नेहमीच रंगभूमी होती. प्रत्येकजण चित्रे रंगवीत असे किंवा गाणी म्हणे, गोष्टी सांगे. आम्ही लढवय्ये नव्हतो ; कलावंत होतो."

ज्यांना सर्वधर्मसमभाव मान्य आहे, त्यांना ह्या एकंदर परिस्थितीपासून उत्तेजन मिळू शकेल. सर्वच धर्मांनी वेगवेगळ्या प्रकारे सामाजिक अन्यायांशी जुळवून घेतले आहे असाच इतिहास आहे. आणि म्हणून सर्वच पारंपरिक धर्मांची सुधारणा होणे आवश्यक आहे.



## साभार पोच

* व्ही. के. चिपळूणकर (इंग्रजी ग्रंथ)– वाय. डी. फडके; नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, नवी दिल्ली–५; १९८२; पृ. ८६; किं. रु. ५.५०

* रानवारा– नलिनी महाडीक; रवींद्र प्रकाशन, ३८१ सोमवार पेठ, सातारा; १९८३; पृ. ९७; किं. १५ रुपये.

* पाखरांच्या आत्महत्येनंतर (कवितासंग्रह)– प्रमोद मनोहर कोपर्डे; नीलकंठ प्रकाशन, १६४३ सदाशिव पेठ, पुणे– ४११०३०; १९८३; पृ. ५९; किंमत १० रुपये.

* जागल (कवितासंग्रह)– बा. ह. कल्याणकर; युगकर्ता प्रकाशन, शिवनेरी, प्लॉट नं. १३, सेक्टर एफ. एन. ५, सिडको, औरंगाबाद; १९८२; पृ. ५०; किं. १३ रुपये.

* सर्वोत्कृष्ट मराठी कथा (खंड १४)– संपा. राम कोलारकर, सौ. छाया कोलारकर; प्रकाशक सौ. छाया कोलारकर, ४३/३४८ संत तुकाराम नगर, पिंपरी, पुणे–१८; १९८३; पृ. २१६; किं. ३५ रुपये.

* कृष्णराव भालेकर समग्र वाङ्मय– संपा. सीताराम रायकर; महात्मा फुले प्रतिष्ठान प्रकाशन, ७३ नाना पेठ, पुणे–२; १९८३; पृ. २५८; किं. ५० रुपये.

* अलक्ष (कवितासंग्रह)– चंद्रकांत महामुनी (राजीव); देवदत्त प्रकाशन, ११९ ब, गणेश पेठ, सोलापूर; १९८३; पृ. ५८; किं. ११ रुपये.

* महामानव डॉ. आंबेडकर– प्रकाशिका सौ. यशोदा सोनार; चेतश्री प्रकाशन, देशमुख चाळ, अंमळनेर –४२५ ४०१; १९८३; पृ. २९; किं. ४ रुपये.

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

*With Best Compliments from—*

# Kirloskar Pneumatic Co. Ltd.

## *PUNE 411 013*

**Leading manufacturers of—**

**A wide range of Air & Gas Compressors, Pneumatic Tools, Air Conditioning And Refrigeration and Hydraulic Transmission.**

**Phone : 70133/70341**

**Gram : SANJAY** **Telex : 0145-246, 0145-306**





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमालेची

## संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | |
|---|---|
| * वैदिक संस्कृतीचा विकास । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३० रु. |
| * अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र० स्वामी केवलानंदसरस्वती | ७५ रु. |
| * क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य । डॉ० रा० भा० पाटणकर | १० रु. |
| * पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ० सुमंत मुरंजन | ८ रु. |
| * गीता-प्रवेश । डॉ० गो० वि० देवस्थळी | ५ रु. |
| * लोकशाहीचे धोके । पन्नालाल सुराणा | ४ रु. |
| * भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श । सौ० कमल पाध्ये | ४ रु. |
| * हिंदी साहित्यविचार । प्रा० प्यारेलाल गोहेल | ३ रु. |
| * महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना । चा० अ० दाभोलकर | २ रु. |
| * श्री० यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ | २० रु. |
| * संशोधन साधना । डॉ० वसंत स० जोशी | १२ रु. |
| * ज्ञानदेव चिंतन (संपादित) । डॉ० वसंत स० जोशी | २० रु. |
| * आनंदाचा डोह । प्रा० रा० ग० जाधव | ८ रु. |
| * भावार्थ रामायण (श्री एकनाथ महाराजकृत) बालकांड | १२ रु. |
| * तरंगयामिक व पुंजयामिक । मा० ग० टोळे | ५ रु. |
| * आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | २० रु. |
| * वागीश्वरी । डॉ० गो० के० भट | १० रु. |
| * नवमानवतावाद व मानवाचा आदर्श | १२ रु. |
| * प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं० वा० लेले | ७ रु. |
| * बौद्धधर्माचा अभ्युदय आणि प्रसार (पुनर्मुद्रण) । प० ल० वैद्य | ५ रु. |
| * चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (आवृत्ती दुसरी) । सदाशिव आठवले | १५ रु. |
| * गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ५ रु. |
| * दास-शूद्रांची गुलामगिरी । शरद् पाटील | २५ रु. |

**ग्रंथालये व ग्रंथविक्रेत्यांना २० टक्के कमिशन**

संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (जि. सातारा)



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

